# सोविएत चित्रपट

[illegible]

व्लादिमीर बस्काकोव

अनुवाद

अनिल हवालदार

सोविएत देश पुस्तिका

१९६८

## अनुक्रमणिका

*'सोविएत चित्रपट' या पुस्तकाचे लेखक व्लादिमीर बस्काकोव हे सोविएत मंत्रिमंडळाच्या कक्षेतील चित्रपटशास्त्र-समितीचे पहिले उपाध्यक्ष आहेत.*

*या छोट्या निबंधात त्यांनी सोविएत चित्रपटांचा उगम आणि प्रमुख अवस्था यांचा मागोवा घेतला आहे.*

# चित्रपटकला आणि क्रांती

अकॅपुल्को या मेक्सिकोतील रम्य स्थळी दरवर्षी चित्रपट-प्रदर्शनाचा एक अपूर्व महोत्सव होतो. याला महोत्सवांचा महोत्सव म्हटले जाते.

सध्याच्या काळात जगात इतके चित्रपटमहोत्सव साजरे होत आहेत की, या महोत्सवांना सूज आली आहे अशी परदेशीय वृत्तपत्रांमधून टीका होत आहे. परंतु अकॅपुल्को येथील महोत्सव अगदी वेगळ्या प्रकारचा आहे. या महोत्सवाला परीक्षक नसतात आणि एखाद्या नेमलेल्या समितीकडून चित्रपटांची निवड करण्याचा प्रश्नही येथे उद्भवत नाही. कान्स, व्हेनिस, मॉस्को, कार्लोवी वारी, सॅन सेबॅस्टियन आणि लोकार्नो अशा जगातील महत्त्वाच्या चित्रपटमहोत्सवांमध्ये ज्या चित्रपटांना पारितोषिके मिळतात तेवढेच चित्रपट या महोत्सवात दाखविले जातात, त्यामुळे चित्रपटकलेतील चालू घडीच्या प्रवृत्तीचे सम्यक् दर्शन या महोत्सवांतून घडते.

सोविएत प्रतिनिधिमंडळातील एक सभासद या नात्याने या महोत्सवाला हजर राहण्याची मला एकदा संधी मिळाली. त्यावेळी मॉस्को चित्रपटमहोत्सवातील सर्गी बोंदारचुक यांचा **युद्ध आणि शांतता** हा पारितोषिकविजेता चित्रपट आम्ही घेऊन गेलो होतो.

महान रशियन लेखक लिओ तोल्स्तोय यांची कादंबरी रजतरूपाने सॅन दिआगोच्या पुरातन किल्ल्यामधील प्रचंड पडद्यावर झळकली. हा किल्ला बंडखोर इंडियन लोकांना धाक बसावा म्हणून त्यावेळच्या विजेत्यांनी बांधला होता. उष्ण कटिबंधातील त्या गडद काळ्या आकाशाच्या छताखाली प्रेक्षकांनी रशियन निसर्गाची दृश्ये पाहिली—हिरवीगार कुरणे, बर्चची झाडे, उतारूंनी किनारलेल्या छोट्या नद्या. आपल्या देशाच्या रक्षणार्थ लढणाऱ्या रशियन सैनिकांचे त्यांना दर्शन घडले आणि स्वप्नाळू डोळ्यांची नताशा तिच्या पहिल्या नाचाच्या वेळी भिरभिरतानाहि त्यांनी पाहिली.

प्रेक्षकांनी या चित्रपटाला मनःपूर्वक प्रतिसाद दिला. मधूनमधून टाळ्यांच्या कडकडाटाने ते प्रचंड ॲम्फि-थिएटर हादरत होते. वृत्तपत्रांनी चित्रपटाच्या यशाची दखल घेतली, त्याच्या सुंदर दिग्दर्शनाचे कौतुक केले, समूहदृश्यांच्या सुबक चित्रणाबद्दल व उत्कृष्ट दर्जाच्या अभिनयाविष्काराबद्दल पाठ थोपटली.

सोविएत चित्रपटसृष्टीशी मेक्सिकन चित्रपटशौकिनांची ही काही पहिलीच ओळख नव्हे. उदात्त मानवतावादाचे दर्शन आणि उत्तम कलागुणांबद्दल कान्स चित्रपटमहोत्सवांत पारितोषिक मिळवणारा ग्रिगरी चुखराय यांचा **सैनिकाचा पोवाडा** या महोत्सवाच्या महोत्सवात दाखविला गेला आहे. त्यापूर्वी सर्गी बोंदारचुक यांचा **माणसाचे दैव,**

मिखाएल कलातोझोव यांचा **बलाकमाला उडते आहे,** जॉर्जी दानेलिया आणि इगोर तालान्किन यांचा **सेर्योझा,** आंद्री, तार्कोवस्की यांचा **इवानचे बालपण** आणि सर्गी गेरासिमोव यांचा **संथ वाहते दॉन** हे चित्रपट येथे दाखविले गेले आहेत.

सोविएत बोलपट पाचहि खंडांमधील रजतपटावर झळकले आहेत. चित्रपट-शौकिनांना त्यांची माहिती आहे, वृत्तपत्रांनी त्यांचे समीक्षण केले आहे आणि चित्रपट-तज्ज्ञांनी त्यांच्यावर चर्चा केल्या आहेत. **सोविएत** (ह्या शब्दावर मी जोर देतो) चित्रपटांनी लाखो लोकांची मान्यता मिळविली आहे. मार्क्सवादी आणि आंतरराष्ट्रीयतावादी विचारांची महती गाणाऱ्या सर्गी युत्केविच यांच्या **पोलंडमध्ये लेनिन** या चित्रपटाला १९६६ साली कान्स चित्रपट-महोत्सवात एक प्रमुख पारितोषिक मिळाले आहे.

महान् ऑक्टोबर समाजसत्तावादी क्रांतीमधून जन्माला आलेली सोविएत चित्रपटकला ही नव्या जगाची कला आहे.

क्रांतीपूर्वी चित्रपट-उद्योग रशियात अस्तित्वात होता ही गोष्ट खरी आहे. अनेक युरोपीयन व अमेरिकन कंपन्या रशियात निर्माण झाल्या होत्या. त्यांच्याशी स्थानिक स्टुडिओंनी तात्काळ सहकार्य करून पुष्किन–तोल्स्तोय् यांच्यासारख्यांच्या कलाकृतींपासून तो सामान्य दर्जाच्या फार्सपर्यंत अनेक चित्रपट भराभर निर्माण केले. त्यावेळी काही अत्यंत हुषार आणि बुद्धिमान असे चित्रपट-निर्मातेही होते. परंतु क्रांतीने रशियन चित्रपटकलेला वेगळे वळण दिले; केवळ मनोरंजनापेक्षा खराखुरा कलाविष्कार या प्रकारामधून घडवायला सुरुवात करून दिली. मनोरंजनाशिवाय लोकांनी कसे जगावे, लढावे, चारित्र्य घडवावे याचे शिक्षण चित्रपट देऊ शकतात हे सिद्ध केले. खऱ्याखुऱ्या सांस्कृतिक क्रांतीसाठी चित्रपट हे एक प्रभावी शस्त्र ठरले. लेनिन यानी म्हटल्याप्रमाणे, 'मानवजातीच्या श्रमांमधून मिळवलेल्या' या संपत्तीची, महान् सांस्कृतिक मूल्यांची प्रचंड प्रमाणावर लाखो लोकांना ओळख करून देण्याचे कार्य सोविएत प्रजासत्ताकांनी पार पाडले. शेक्सपीअर व तोल्स्तोय् यांच्या पुस्तकांच्या लाखो प्रती प्रकाशकांनी छापल्या.

नाट्यगृहे, संस्था व ग्रंथालये सुरू झाली. विज्ञान व शरीरशास्त्रामधील नव्या सिध्दींची ओळख करून देण्यासाठी विद्वान माणसे देशातील दूरदूरच्या ठिकाणी व्याख्याने देण्यासाठी जाऊ लागली. अंतराळभ्रमणाचा सिध्दांत कालुगा येथील गणिताचे शिक्षक सिओल्कोवृस्की यांनी कौशल्याने निर्माण केला. कॉन्स्तन्तिन स्तानिस्लावृस्की, व्लदिमीर नोमिरोविच्-दान्चेन्को आणि व्सेवूलोद मायरहोल्ड यांनी रंगभूमीवर नाटके सादर केली. क्रांतिकवी मायकोवस्कींनी संबंध देशभर प्रवास केला आणि तरुणांशी चर्चा केल्या, वादविवाद केले, कविता वाचून दाखविल्या. सोरेन्टोहून गोर्कींनी सोविएत संघराज्यातील तरुण लेखकांशी पत्रव्यवहाराने संपर्क ठेवला. या पत्रव्यवहारातून साहित्यात

एक नवी धारणा निर्माण झाली. पुढे सोविएत संघराज्यात आल्यानंतर गोर्कींनी साहित्य व कलाक्षेत्रांत क्रांतिकारी चळवळी सुरू करण्यात पुढाकार घेतला.

चित्रपटशास्त्र ही सर्व कलांमध्ये अत्यंत महत्त्वाची अशी कला आहे, असे लेनिन म्हणत असत. ही कला लोकशिक्षणाच्या अभूतपूर्व प्रक्रियेपासून वेगळी राहिली नाही. ती खरीखुरी सुधारणावादी कला बनली. ज्या ठिकाणी कधी मोटारींचे दर्शन घडले नव्हते अशा ठिकाणीही पांढरे पडदे उभारले गेले.

लोकांची व क्रांतीची सेवा करू शकेल अशी कला निर्माण करण्याची इच्छा असलेली माणसे मॉस्को, लेनिनग्राद, कीएव आणि तिबिलिसी येथील चित्रपट-निर्मितीच्या स्टुडिओंमध्ये आली. झ्दिगा वेर्तोव हे त्यांपैकी एक होते. मॉस्कोतील एका जुनाट वाड्याच्या छोट्या झरोक्यात त्यांनी आपला विख्यात ‘ फिल्मी-डोळा ’ शोधला आणि नंतर असे शोध लावले की, जागतिक चित्रपटकलेच्या विकासामध्ये तो एक महत्त्वाचा टप्पा ठरला. चाळीस वर्षांनंतर ज्यावेळी फ्रान्समध्ये ‘ सिनेमा व्हेरिते ’ प्रथम अवतरले तेव्हा त्यांचे खरे मूल्यमापन झाले.

‘ जीवनाकडे सहजपणे ’ पाहण्यापेक्षा अधिक काहीतरी शोधण्याचा दझिगा वेर्तोव यांनी प्रयत्न केला. त्यांनी विचारपूर्वक निर्मिलेल्या **फिल्मी सत्य** मालेत आपल्याला युद्धाच्या जखमांमधून नुकत्याच बऱ्या होणाऱ्या नवजात सोविएत प्रजासत्ताकाचे दर्शन घडते. हे प्रजासत्ताक अद्याप गरीब आणि दुर्बल असलेले त्यात दिसते, परंतु ते आपले सामर्थ्य पुन्हा मिळवीत असलेले व आत्मविश्वासाने नव्या जीवनाची उभारणी करीत असलेले दिसते.

**पुढे चला, सोविएत, कॅमेरा असलेला माणूस, दोन्बासचा स्वरमेळ** आणि **लेनिन यांची तीन गीते** हे झ्दिगा वेर्तोव यांचे चित्रपट म्हणजे या युगाचे केवळ दस्तऐवजच नाहीत. चित्रपटकलेतील ती एक धारणा होती. आजही वार्तापट तयार करणाऱ्यांवर त्यांच्या धारणेचा प्रभाव पडत असलेला दिसून येतो.

खुद्द दझिगा वेर्तोव यांच्यावर व्लादिमीर मायाकोव्स्की यांच्या सौंदर्यवादी दृष्टिकोनाचा विलक्षण प्रभाव पडलेला होता. त्या क्रांतिकवीच्या आविष्कारांशी व लेखांशी या तरुण दिग्दर्शकाचे लेख शैलीच्या दृष्टीने अगदी मिळतेजुळते होते. अनेक ठिकाणी त्यांच्यात अतिशयोक्ती होती, चुका होत्या, परंतु उत्स्फूर्त आणि हेतुप्रधान विचारांनी ते काठोकाठ भरलेले होते.

कॅमेऱ्याच्या प्रचंड सामर्थ्याचे गुणगान करताना वेर्तोव लिहितात, “ मी चित्रपटाचा डोळा आहे. परमेश्वराने निर्माण केलेल्या आदमपेक्षा मी अधिक परिपूर्ण माणूस तयार करतो. चित्रांच्या व आराखड्यांच्या बरहुकूम मी हजारो माणसे निर्माण करतो.” ते पुढे

लिहितात, " मी चित्रपटाचा डोळा आहे...मी सतत गतिशील असतो. वस्तूंच्या मी जवळ जातो. धावणाऱ्या घोड्याच्या तोंडाजवळून मी पळतो. जमावाच्या वर मी तरंगतो. धावणाऱ्या सैनिकांच्या पुढे मी पळतो. मी माझ्या पाठीवर पडतो. विमानांबरोबर मी उड्डाण करतो. उडणाऱ्या आणि पडणाऱ्या वस्तूंबरोबर मीही उडतो आणि पडतो..."

वार्तापटांमधील वेर्तोव यांच्या कामगिरीचे मूल्यमापन करणे अवघड आहे.

**पोत्योम्किन युद्धनौका** पडद्यावर अवतरल्यानंतर संपूर्ण लांबीच्या निर्मिती-मध्ये लक्षणीय क्रांती घडून आली. सर्गी आयजेन्स्टायन यांना प्रतीकांमध्ये केवळ सुप्त शक्तीच सापडल्या असे नव्हे, तर त्यांना त्यांचा देश सापडला, जगाला दाखविण्यासाठी त्या देशाची क्रांती आणि माणसे त्यांना गवसली. १९०५ मधील रशियन क्रांतीतील काळ्या समुद्रावरील काफल्यातील जहाजावरील खलाशांच्या उठावाची आयजेन्स्टाइन यांच्या चित्रपटातील कथा म्हणजे जगाला हादरविणाऱ्या त्या ऐतिहासिक घटनांचा निष्कर्ष बनली आहे. त्या बंडखोर जहाजाच्या डोलकाठीवर फडफडणाऱ्या लाल ध्वजाने [ त्यावेळी फिल्मच्या प्रत्येक प्रतीवरील लालध्वज हा हाताने रंगविलेला असे ] सगळीकडच्या चित्रपट-शौकिनांच्या अंतःकरणांमध्ये खळबळ उठविली. क्षणाक्षणाला विनाशाची धास्ती घालणाऱ्या झंझावाती सागराच्या लाटांवर अज्ञाताकडे हेलकावत जाणाऱ्या जहाजासारखीच त्यावेळी सोवियत रशियाची अवस्था होती.

चित्रपट-दिग्दर्शक आणि सैद्धांतिक ग्रिगरी कोझिन्त्सेव **पोत्योम्किन** व **आक्टोबर**च्या निर्मात्याविषयी लिहितात, " आयजेन्स्टाइन यांची कला क्रांतीच्या पुढाऱ्यांच्या भाषणांना, त्यांमधील विद्युत्‌शलाकेसारख्या चमकणाऱ्या उपमांना जवळची आहे आणि त्यांच्या निष्कर्ष काढण्याच्या सामर्थ्याशीही तिची जवळीक आहे." चित्रपट-दिग्दर्शक सर्गी गेरासिमोव लिहितात, " आयजेन्स्टाइन यांच्या क्रांतिकारी प्रवृत्तीस अतिप्रचंड प्रयोगशीलतेची जोड मिळाली आहे. ज्यामधून आशयाची उत्तम अभिव्यक्ती होईल अशी त्या काळातील अस्तित्वात असलेली सिनेमाची वैशिष्ट्ये वेगळी काढण्यात त्यांचे कौशल्य होते. चित्रपटाच्या सुरुवातीच्या जमान्यात अंतर्भागातील संकुचित पार्श्वभूमीवर घडणाऱ्या आत्महत्या, तळपती शस्त्रे आणि डोळ्यांभोवती काळी वर्तुळे पडलेल्या नट-नट्यांच्या चेहऱ्यांची समीप दृश्ये अशा गोष्टींनी ठासून भरलेल्या अतिरंजित नाट्यामधून त्यांनी चित्रकथेला बाहेर काढले आणि क्रांतिकारी खलाशांबरोबर युद्धनौकेवर आणले. त्यांनी निर्माण केलेली ही कलाकृती सामाजिक लढ्यांची अभिजात प्रतिमा ठरली आणि त्यांनी धाडसाने वर फडकविलेल्या लाल ध्वजाच्या रंगाला भवितव्यातील नव्या कलेची अपूर्व शक्ती ठरविणारे अलौकिकत्व प्राप्त करून दिले. आयजेन्स्टाइन यांनी वजावलेली ही कामगिरी ! नंतर ती परंपरा

ठरली व प्रत्येक नव्या कलाकृतीला **पोत्योमकिन युद्धनौकेचा** मानदंड लावण्यात येऊ लागला. या पृथ्वीतलावर जेथे जेथे चित्रपटशास्त्र अस्तित्वात आहे तेथे तेथे या चित्रपटाने विजयी वाटचाल केली व चित्रपटशास्त्रीय विचारांचे, नव्या दृष्टिकोनांचे नवे मानदंड ठरवून दिले, नव्या पद्धती ठरवून दिल्या."

पुढे म्हटले आहे. "चित्रपटाचा अखिल-राष्ट्रीय व जागतिक विकास घडविण्याचे ग्रिफिथ यांचे प्रारंभिक प्रयत्न आयजेन्स्टाइन यांनी एकत्रित केले आणि स्वतःच्या पद्धतीने त्यांना समृद्ध करण्याचा प्रयत्न केला. अशाप्रकारे, नंतरच्या काळात **नारोद्नोस्त** किंवा लोकांची मैत्री ही चित्रपटकलेतील एक परंपरा बनली. चित्रपटाच्या विकासाबाबत आपला काहीही भिन्न दृष्टिकोन असला, तरी ही परंपरा मोडण्याची आपली कुणाचीही ताकद नाही. कारण प्रत्यक्ष जीवनच त्याला प्रतिकार करते.

"व्सेवोलोद पुदोव्किन यांनी तयार केलेल्या तीन प्रमुख चित्रपटांमध्ये यश आणि नवा पंथ यांबाबतीत असाच योगायोग स्पष्टपणे दिसून आला. ही घटना आपण कुणीही विसरलो नाही किंवा विसरू शकणार नाही. मूक चित्रपटांच्या जमान्यातील त्यांच्या तीन कलाकृतींचा मला येथे निर्देश करावयाचा आहे. **आई, सेंट पीतर्सबर्गची अखेर** आणि **आशियावरील तुफान** या नांवाने जगभर विख्यात असलेला **चेंगिझखानाचा वंशज.** या काळामध्ये या ताकदीच्या कलावंतांनी आपल्या कलेचा हा दर्जा निश्चित केला. आज आपल्याला दिसत असलेल्या चित्रपटकलेचा उगम हा असा झाला."

जागतिक चित्रपटकलेमध्ये त्याकाळी सोविएत चित्रपट विद्यालयाला महत्त्वाचे स्थान प्राप्त झाले, एवढे मात्र खरे.

मॉस्कोमध्ये लेव कुलेशोव यांच्या प्रयोगशीलतेचा नाव गाजावाजा होत होता. रंगभूमीवरील अभिनयाचे व दिग्दर्शनाचे शिक्षण देणारे विद्यालय त्यांनी स्थापन केले आणि प्रतीकांच्या क्षेत्रात अनेक नवे शोध लावले. व्सेवोलोद पुदोवकिन हे त्यांच्याच विद्यालयातून पदवीधर झाले. आपल्या या शिक्षकाबद्दल ते म्हणाले होते, "खुल्या सागरामध्ये आम्ही त्यांच्या खांद्यावर बसून गेलो."

या चित्रपटरूपी सागरावर धैर्याने पर्यटन करणाऱ्या कप्तानांमध्ये व्सेवोलोद पुदोवकिन लौकरच दाखल झाले. माक्झिम गॉर्की यांच्या **आई** या कादंबरीवर त्याच नावाने त्यांनी निर्माण केलेला चित्रपट युगप्रवर्तक ठरला. त्यातील पात्रे इतकी वास्तव होती, व चित्रपट-दिग्दर्शनाचा त्यांचा दृष्टिकोन इतका नवा होता की, प्रेक्षक आणि चित्रपट-टीकाकार हेलावून गेले. ठसठशीत आशयाची अभिव्यक्ती आणि संपूर्णतया वास्तव व नेमक्या अभिनयाविष्कारासहित प्रतीकांचा वापर हे पुदोवकिन यांचे वैशिष्ट्य ठरले. त्यानंतर त्यांचे **आशियावरील तुफान** जागतिक रजतपटावर वाजतगाजत आले व

त्यामागून, त्यावेळच्या नवजात सोविएत साहित्यामधून चर्चिल्या जाणाऱ्या विषयावरील—जनता आणि क्रांतीच्या विषयावरील—मूलतः चित्रपटासाठी लिहिलेल्या कादंबरीवर आधारलेला **सेंट पीतर्सबर्गची अखेर** पडद्यावर आला.

श्रेष्ठ इटालिन चित्रपट-तज्ज्ञ गिदो अॅरिस्टार्को यांनी लिहिले होते, "आयजेन्स्टाइनप्रमाणे पुदोवकिन यांनी ग्रिफिथना आपले गुरू मानले होते. परंतु सांगीतिकदृष्ट्या संपन्न बनलेला प्रतीकांचा वापर, त्यांचे विविध सर्जनशील प्रकार आणि त्यांचा सतत वापर, या साऱ्यांचे श्रेय रशियाकडे—पुदोवकिन आणि आयजेन्स्टाइन यांच्याकडे—जाते."

सोविएत चित्रपट वैविध्यपूर्ण कलाप्रकार म्हणून प्रगत झाला होता आणि त्याच्या रंगभांडारात सतत भर पडत होती.

**झ्वेनिगोरा** आणि **आर्सेनल** या अत्यंत काव्यात्म चित्रपटांची निर्मिती करणारा अलेक्झांदर दोवझेन्को नामक तरुण दिग्दर्शक युक्रेनमध्ये उदयास आला. त्याचे चित्रपट म्हणजे काव्यमय स्वप्नांचा मूर्तिमंत आविष्कार होता. प्रगाढ भावनात्मकता आणि काव्यात्मकता, श्रेष्ठ महाकाव्य आणि सखोल तत्त्वज्ञान, लोकगीतांची स्वाभाविकता आणि अलंकारिक भावनोत्कटता यांचा तो सुरेख संगम होता.

दोनझेन्को यांच्या **धरती** या विलक्षण काव्यात्मक चित्रपटाने सबंध जगावर ठसा उमटविला.

आजच्या काळात, जगातील सर्व चित्रपट-विद्यालयांमधून **धरती** चा अभ्यास केला जात आहे. चित्रपट-दिग्दर्शनावरील अनेक पुस्तकांमध्ये या चित्रपटामधील अनेक बोलकी छायाचित्रे विखुरलेली आढळून येतात.

ग्रिगरी कोझिन्त्सेव आणि लिओनिद त्राउबर्ग या लेनिनग्रामधील दोन तरुणांनी एफ्. ई. सी. [ फॅक्टरी ऑफ द एक्सेंट्रिक अॅक्टर ] स्टुडिओ स्थापला. केवळ तात्त्विक चर्चा न करता त्यांनी चित्रपट निर्माण केले.

या विद्यालयामधून अनेक श्रेष्ठ सोविएत चित्रपटनिर्माते निर्माण झाले. या विद्यालयाच्या विद्यार्थ्यांनी चित्रपटातील अभिव्यक्तीसाठी नव्या साधनांचा वापर केला. रजतपटाची नवजात कला मोठी करण्यात भरीव कामगिरी करणाऱ्या त्यांच्या चित्रपटांमध्ये तारुण्यसुलभ जोम होता. ते काळ व कला यांच्याकडे गंभीर दृष्टिकोनातून पहात होते.

१९३० नंतरच्या काळात [ बोलपटांचा जमाना नुकताच सुरू झाला होता ] एका क्रांतिकारक कामगाराची कथा सांगणारे तीन चित्रपट — **माक्झिमच्या तीन कथा** — कोझिन्त्सेव आणि त्राउबर्ग यांनी सादर केले. आगळ्या विषयांकडे, तीव्रतेकडे व विरोधाभासाकडे कल असलेल्या या विद्यालयातील चित्र-निर्मात्यांनी अत्यंत साधे वास्तव चित्रपट

निर्माण केले. माक्झिम नामक क्रांतिकारक कामगाराची भूमिका बोरिस चिर्कोव या तरुण नटाने साकार केली. ऑक्टोबर क्रांतीच्या महान् सैन्यामध्ये सामील होणाऱ्या पीतर्सबर्गमधील औद्योगिक विभागातील रशियन मुलाचे चित्र त्याने अचूकपणे व वास्तव दृष्टिकोनातून रजतपटावर उमटविले.

**माक्झिमच्या तीन कथा** हा सोविएत चित्रपटाचा मोठा विजय होता, वास्तववादी मार्गावरील प्रचंड विजय होता. दिमित्री शोस्ताकोविच यांनी या चित्रपटाला संगीत दिले होते. हे महान संगीत रचनाकार १९२० पासून चित्रपटांसाठी संगीतरचना करीत आहेत.

सोविएत चित्रपटाची आगेकूच आत्मविश्वासाने चालू होती.

एफ्. ई. सी. कंपनीत नट म्हणून काम करणाऱ्या सर्गी गेरासिमोव यांनी आर्क्टिक मोहिमेतील लोकांवर **सात शूर वीर** हा चित्रपट निर्माण केला. अतिपूर्वेत **कोम्सोमोल्स्क** नामक नवे शहर बांधणाऱ्यांच्या जीवनावर त्याच नावाचा एक चित्रपट त्यांनी तयार केला, तसेच **शिक्षक** नावाचा चित्रपटही त्यांनी निर्माण केला. पात्ररचना आणि पार्श्वभूमी यांमधील वास्तवता आणि अचूक बारकावे यांमुळे हे तीनही चित्रपट वैशिष्ट्यपूर्ण ठरले.

याकोव प्रोताझानोव यांच्या लोकप्रिय विनोदी चित्रपटांनीही १९२० नंतरची दोन दशके गाजली.

स्वभाववैचित्र्य, राजकीय जोम आणि सखोल मानसिक चरित्रचित्रण ही फ्रीड्रिक एर्मलेर यांच्या चित्रपटांची खास वैशिष्ट्ये होती. **किसान, महान् नागरिक** आणि **विरोधी कट** [ सर्गी युकेविच यांच्याबरोबरची सहनिर्मिती ] हे चित्रपट त्यांनी या काळात निर्माण केले. **बाल्तिकचा प्रतिनिधी** या चित्रपटात 'प्रज्ञावंत आणि क्रांती' या विषयाचा सुंदर बुद्धिवादी अविष्कार आयोसिफ खिफित्झ आणि अलेक्झांदर झार्खी यांनी दाखविला.

चित्रपट-निर्मितीमध्ये अधिक तांत्रिक सोयी निर्माण झाल्या. लेनिनग्रादमध्ये लेन्फिल्म स्टुडिओची स्थापना झाली. १९३० नंतरच्या काळातील सोविएत चित्रपटांची धारणा, स्वरूप आणि शैली ठरविण्याबाबत या स्टुडिओचा साधन म्हणून उपयोग झाला. मॉस्कोनजीकच्या पोतिलिखा खेड्यामध्ये प्रचंड अशा मॉस्फिल्म स्टुडिओची उभारणी सुरू झाली. मॉस्को विद्यापीठाच्या विस्तीर्ण परिसरातील निवास-विभागाच्या मध्यभागी वसलेल्या ह्या स्टुडिओची युरोपातील प्रचंड स्टुडिओंमध्ये गणना होते.

जागतिक चित्रपटकलेला 'आवाज' लाभल्यामुळे नवी चालना मिळाली. आमच्या देशातही पहिला बोलपट ही महत्त्वाची घटना ठरली. या पहिल्या सोविएत बोलपटाचे

नाव **जीवनाचा मार्ग** असे होते. यादवी युद्धातील बेवारशी मुले—कालचे बालगुन्हेगार—विधायक कार्यकर्ते कसे बनले याची गोष्ट या बोलपटात सांगितली होती. सोविएत संघराज्यात हा बोलपट खूप लोकप्रिय झाला आणि जगातील अनेक देशांमधूनही तो प्रदर्शित झाला. इतर सोविएत चित्रपटाप्रमाणेच यातही मानवतावाद आणि दयाळू-पणाच्या कल्पनांवर आणि व्यक्तीच्या सर्जनशील मूल शक्तींवर विश्वास ठेवण्यावर भर देण्यात आला होता.

सोविएत चित्रपटाचा भौगोलिक विस्तार पसरत पसरत जॉर्जिया, आर्मेनिया, अझरबैजान, श्वेतरशिया आणि मध्य आशियापर्यंत गेला. निकोलाय शेंगेलाया आणि मिखाइल चिऔरेली हे दोन उत्तम चित्रपट-दिग्दर्शक जॉर्जियामधून उदयाला आले, तर आर्मेनियाने अमो बेक-नझारोव यांची जगाला देणगी दिली.

जगातील चित्रपटविषयक वृत्तपत्रांमध्ये १९२० नंतरच्या काळातील सोविएत चित्रपटकलेवर खूप लिहीण्यात आले आहे. अखिल चलचित्रपट-रोजनिशींमध्ये आणि चित्रपटांच्या इतिहासांमध्ये दझिगा वेर्तोव यांच्या प्रयोगांबद्दल, सर्गी आयजेन्स्टाइन यांच्या **पोत्योम्किन युद्धनौका** आणि **ऑक्टोबर** या चित्रपटांबद्दल, लेव कुलेशोव यांच्या शोधांबद्दल आणि अलेक्झांदर दोवझेन्को व वुसेवलोद पुदोवकिन यांनी मिळविलेल्या यशांबद्दल खूप गौरवाने उल्लेख करण्यात आले आहेत.

१९२० नंतरच्या काळातील सोविएत चित्रपट म्हणजे चित्रपटकलेतील नवे आणि तेजस्वी पान आहे ही गोष्ट सर्वमान्य झाली आहे.

या उलट, १९३० नंतरच्या काळातील सोविएत चित्रपटांवर परदेशी वृत्तपत्रांमधून बेसुमार प्रमाणात चुकीची वा अपुरी माहिती प्रसिद्ध करण्यात आली आणि टीकेचे जोरदार प्रहार झाले. हा सोविएत चित्रपटांच्या अधोगतीचा काळ होता आणि गुणांना पायबंद घालण्यात आले असाही विचार प्रसृत झाला होता.

हा काळ, विशेषतः १९३५ नंतरचा काळ सोविएत चित्रपटांच्या दृष्टीने गुंतागुंतीचा आणि मतभेदांचा होता, हे सांगण्याची जरुरी नाही. व्यक्तिसंप्रदायाकडून देण्यात येणाऱ्या आदेशाप्रमाणे धारणा निर्माण होत होत्या. तरीही वस्तुतः याच काळात सोविएत चित्रपटकला परिपक्व झाली. या काळातील चित्रपटांमध्ये समाजातील अत्यंत महत्त्वाचे प्रश्न हाताळण्यात आले. शैली, विषय आणि आशय या दृष्टीने हे चित्रपट अगदी वेगळे असले, तरी युद्धपूर्व काळातील लोकांच्या गंभीर परंतु शूर जीवनाचे प्रतिबिंब त्यांच्यात पडलेले होते.

# जीवनाचा आरसा

अलिकडेच सोविएत संघराज्यातील सरकारी चित्रपट-निधीतर्फे—जगातील प्रचंड चित्रपट-भांडारातर्फे—१९३० नंतरच्या काळातील सोविएत चित्रपटांचे सिंहावलोकनात्मक प्रदर्शन ब्रिटन, फ्रान्स व जर्मनीमध्ये भरविण्यात आले. या प्रदर्शनाने बहुसंख्य लोकांचे लक्ष वेधून घेतले आणि त्यामुळे चित्रपट-टीकाकारांना व रसिकांना सारखाच नवा साक्षात्कार झाला.

सोविएत चित्रपट ही काही आता नवलाई राहिलेली नाही. पॅरीस, म्युनिच, लंडन आणि रोम येथील रजतपटांवर **बलाकमाला उडते आहे**, **सैनिकाचा पोवाडा** आणि अलिकडच्या काळातील इतर सोविएत चित्रपट दाखविण्यात आले आहेत. परंतु १९३० नंतरच्या काळातील या चित्रपटांच्या प्रदर्शनाने पाश्चात्य प्रेक्षकांना नवेच दर्शन घडले. सोविएत बोलपटांच्या पहिल्या काळातील फ्रीड्रिक एर्मलेर आणि सर्गी युत्केविच यांच्या **विरोधी कट** या चित्रपटातील कथेच्या व नटाच्या अभिनयाच्या वास्तवतेमुळे ते खूपच प्रभावित झाले. बोरिस बार्नेत यांचा **उपनगरे** त्यांनी पाहिला आणि १९३५ च्या दरम्यान या सोविएत चित्रपटनिर्मात्याने आंतरराष्ट्रीयत्वाचा विषय अत्यंत सखोलतेने हाताळलेला पाहून ते आश्चर्यचकित झाले. सर्गी गेरासिमोव, आब्राम रूम मिखाईल रॉम, आयोसिफ खिफित्स, अलेक्झांदर झार्खी, ग्रिगरी कोझिन्त्सेव आणि लिओनिद त्राउबर्ग यांच्या निर्मिती त्यांनी पाहिल्या. वासिल्येव बधूंचा **चापायेव** आणि येफिम झ्दिगान यांचा **आम्ही क्रोन्स्टाटचे** हे चित्रपट त्यांनी पाहिले. शैलीमध्ये पूर्णपणे वेगळ्या असलेल्या या चित्रपटांमुळे त्यांना युद्धपूर्व काळातील समाजसत्तावादी चित्रपटकलेच्या विकासाचे विस्तृत दर्शन घडले.

ज्या लोकांना मर्दुमकी गाजवायला क्रांतीने प्रवृत्त केले, त्यांच्याबद्दल आणि यादवी युद्धाबद्दल काही सांगणारा **चापायेव** हा काही केवळ एकच चित्रपट नव्हता. जनसमुदायातील एका माणसातून निर्माण झालेल्या लष्करी जनरलची—यादवी युद्धातील एका काल्पनिक नायकाची—ही कथा आहे. दिग्दर्शकांनी हा नायक त्याच्या सगळ्या वैशिष्ट्यपूर्णतेसकट रंगविला आहे. त्याचा शेतकऱ्याचा ' धूर्तपणा ', आपल्या बांधवांबद्दल त्याला असणारी जाण, त्यांचे हितसंबंध आणि सत्यासाठी व अधिक चांगल्या जीवनासाठी चाललेली त्यांची धडपड समजून घेण्याची कुवत—या सर्व गोष्टी त्याच्या स्वभावात दाखविल्या आहेत. बोरिक बाबोचकिन यांनी पडद्यावर साकार केलेला हा नायक लाखो प्रेक्षकांना खरा चापायेव भासला. चापायेव असाच घोड्यावरून दौडत जात असेल, त्याच्या हाताखालच्या लोकांची तो अशीच खरडपट्टी काढीत असेल, कोमिसार फुर्मानोव यांच्याकडून

त्याने याचप्रकारे क्रांतिकारी शिस्तीचे पाठ घेतले असतील आणि उरल नदीच्या थंडगार पाण्यात अशीच त्याच्या जीवनाची अखेर झाली असेल, असे त्यांना वाटले.

खरोखरीची लोकप्रिय व्यक्तिरेखा दाखविण्यात वासिल्येव बंधू यशस्वी ठरले. १९३० नंतरच्या काळातील लहान मुलांच्या पिढीत चापायेव विलक्षण लोकप्रिय होता आणि मुले खोट्यावर कधी विश्वास ठेवीत नाहीत. या चित्रपट नायकाची प्रतिमा कमालीची वास्तववादी होती. उरल नदीतला त्याचा मृत्यू पाहून लाखो लोक असे हळहळले की, जणू त्यांच्या निकटच्या प्रिय व्यक्तीचाच मृत्यू झाला. अशी एक दंतकथा आहे की, हा चित्रपट वीस वेळा पाहणाऱ्या एका मुलाला याचे कारण विचारले तेव्हा तो उत्तरला, " चापायेव त्या पाण्यातून पोहून बाहेर येईल म्हणून मी वाट पहातोय." युद्धकाळातील गंभीर प्रसंगांना व हालअपेष्टांना विलक्षण मनोधैर्याने तोंड देणाऱ्या सबंध पिढीच्या मनावर चापायेव, ग्रिगरी कोझिन्त्सेव यांचा क्रांतिकारक कामगार माक्झिम, लिओनिद् त्राउबर्ग यांच्या तीन कथा—या सर्वांचा खोल परिणाम झाला होता.

लंडन येथील सोविएत चित्रपटांचे सिंहावलोकनात्मक प्रदर्शन पाहिल्यानंतर ब्रिटिश **सन्डे टाइम्स** च्या चित्रपट-समीक्षकाने लिहिले होते, " ३० वर्षांपूर्वी वासिल्येव-बंधूंनी तयार केलेला **चापायेव** मी प्रथम पाहिला तो काळ मला आठवतो. त्यावेळी रशियावर आक्रमण करण्याची नात्सी तयारी करीत होते आणि या परिस्थितीमुळे काल्पनिक किसान कमांडरच्या आणि १९१९ मधील क्रांतिकारी लढ्याच्या या कथेला वेगळाच अर्थ प्राप्त झाला होता."

अत्यंत काव्यमय प्रवृत्तीचे सोविएत चित्रपटदिग्दर्शक अलेक्झांदर दोवझेन्को हे १९३८ साली निर्माण केलेल्या शोर्स या आपल्या चित्रपटाच्या पटकथेला प्रस्तावना लिहिताना जणू आपल्याबरोबर ' चित्रपट निर्माण करण्याच्या गुंतागुंतीच्या कार्यात ' सहभागी होणाऱ्या सर्वांना उद्देशून म्हणतात,

" चित्रकारांनो, अत्यंत विशुद्ध असे रंग तयार करा. आपण फार पूर्वीच गमावलेले आपले तारुण्य रंगवू या.

" सगळ्या कलाकारांची पाहणी करा आणि देखणे, कळकळीचे कलाकार माझ्याकडे आणा. त्यांच्या नजरेतून मला उदात्त अंतःकरणाचे आणि उत्तुंग भावनांचे दर्शन घडावयाचे आहे.

" रचनाकारांनो, सार्वजनिक शाळेच्या पटांगणात त्यांना एकत्र आणा. पृथ्वीच्या गोलार्धाच्या पार्श्वभूमीवर त्यांना बाकांवर आणि टेबलांवर बसवा. सैनिकांच्या जखमांवर नव्या मलमपट्ट्या लावा, त्यांना एका रांगेत बसवा आणि त्यांच्या तलवारी त्यांच्या पुढ्यातच ठेवा. युद्धातल्या त्यांच्या अतिश्रमानंतर त्यांना विसावा घेऊ द्या.

“ आपल्या युगातील पहिल्या काळाच्या सुखद आठवणी होतील असे कपडे त्यांना घाला.

“ छायाचित्रकारांनो, शुद्ध अशा प्रकाशस्रोतांनी त्यांना प्रकाशमान करा. म्हणजे युक्रेनच्या मैदानावरून त्यांनी आणलेल्या उत्तम गोष्टी त्यांच्या वैशिष्ट्यांसह प्रतिबिंबित होतील, प्रेक्षकांना जाणवतील आणि त्यांच्या वंशजांची मने हेलावतील.

“ खूप श्रम केल्यानंतर येणाऱ्या सुटीच्या दिवसाप्रमाणे हा प्रकाश सौम्य आणि शांत असू दे.

“ त्यांना स्वप्ने पाहू देत. त्यांना खाण्याची, पिण्याची, धूम्रपान करण्याची, फाटलेले कपडे शिवण्याची गरज नाही. तिथे सारे शब्द नकोत, साऱ्या हालचाली नकोत, साधेसुधे तपशील नकोत. सत्यामधील सारे हीण काढून टाका आणि फक्त **विशुद्ध सोन्यासारखे सत्य** ठेवा. दैनंदिन जीवनात त्यांना गुंतवू नका. दैनंदिन जीवन नसतेच ! यादवी युद्ध असते. विजय असतो. आणि लढ्यामधील विश्रांतीचा काळ असतो.”

अलेक्झांदर दोवझेन्को यांचा काव्यात्म चित्रपट हेच केवळ ‘ सत्याचे विशुद्ध सोने ’ नव्हते. **आम्ही क्रोन्स्टाटचे** हा येफिम द्झिगाननिर्मित व व्सेवोलोद विश्नेवस्कीलिखित चित्रपटही यादवी युद्धावर होता—क्रांतीच्या सैनिकांवर होता. परंतु वेगळ्या शैलीत सांगितला होता. नैसर्गिक पार्श्वभूमीवर हा चित्रपट निर्माण केला गेला होता. बाल्तिक सागराच्या कळसट करड्या लाटा, वाऱ्या-वादळाला तोंड देणारे सहनशील खलाशी, क्रांतिकारी पेत्रोग्रादसाठी झालेली लढाई आणि प्रतीकात्मक शेवट—ज्यावेळी आर्तेम नामक खलाशी त्या घनघोर लढाईतून आश्चर्यकारकरीत्या सहीसलामत राहतो आणि प्रेक्षकांना विचारतो. “ आणखी कुणाला पेत्रोग्राद पाहिजे ? ”

ग्रिगोरी कोझिन्त्सेव आणि लिओनिद त्राउबर्ग यांचा **माक्झिमच्या तीन कथा**, सर्गी युत्केविच यांचा **बंदुकधारी माणूस**, आयोसिफ ख्वीफित्झ आणि अलेक्झांदर झार्खी यांचा **बाल्तिकचा प्रतिनिधी** व युली रेझमान यांचा **अखेरची रात्र** या क्रांतिविषयक सुंदर चित्रपटांमधून मानवी स्वभावाचे वास्तवदर्शी चित्रण पहायला मिळते.

ऑक्टोबर क्रांतीमधील प्रसंग आणि तिचे नेते व्ही. आय. लेनिन यांची प्रतिमा रजतपटावर पुन्हा निर्माण करण्याचे अवघड कार्य सोविएत चित्रपटसृष्टीने युद्धपूर्व कालात केले. **ऑक्टोबरमध्ये लेनिन** आणि **१८१८ मध्ये लेनिन** या मिखाइल रॉम यांच्या चित्रपटांमध्ये बोरिस श्चुकिन यांनी प्रमुख भूमिका मोठ्या कौशल्याने वठविली.

युद्धपूर्व काळातील चित्रपटांचे विषय विविध होते, शैली वेगवेगळी होती आणि जीवनविषयक दृष्टिकोन मांडण्याची पद्धत भिन्न होती. आयजेन्स्टाइन यांचे निकट सहकारी ग्रिगोरी अलेक्झांद्रोव यांनी **गंमत्ये दोस्त** हा विनोदी चित्रपट निर्माण केला. आयझॅक

दुनायेवस्की यांनी या चित्रपटासाठी लिहिलेली गाणी साऱ्या देशभर लोकांच्या तोंडी खेळू लागली. अलेक्झांद्रोव यांच्या **सर्कस** आणि **वोल्गा-वोल्गा** सारख्या अितर विनोदी चित्रपटांमुळे उपहास व काव्य, गाणी आणि उपरोध यांचा मिलाफ करणारे सुखद संगीतप्रधान चित्रपट निर्माण होण्याची परंपराच सुरू झाली.

**श्रीमंत नवरी, ट्रॅक्टर ड्रायव्हर्स** आणि **डुकरे पाळणारा व मेंढपाळ** हे अिवान पीर्‍येव यांचे विनोदीचित्रपट खूप लोकप्रिय होते—आजही आहेत.

याच काळात सोविएत ऐतिहासिक चित्रपटांची परंपरा प्रस्थापित झाली. पुरातन काळातील घटनांवर ऐतिहासिक चित्रपट निघू लागले. अलेक्सी ताल्स्तोय् यांच्या **पहिला पीटर** या विख्यात कादंबरीला व्लादिमीर पेत्रोव यांनी रजतरूप दिले. या चित्रपटात लेनिनग्रादचे निकोलाय सिमोनोव व निकोलाय चेर्कासोव आणि मॉस्को आर्ट थिएटरची अला तारासोवा व मिखाइल तार्खानोव या नट-नटींनी अप्रतिम अभिनय केला होता. **पहिला पीटर** हा चित्रपट कमालीचा यशस्वी आणि सुधारणेच्या काळातील रशियावरील एक आदर्श ऐतिहासिक चित्रपट ठरला.

सर्गी आयजेन्स्टाइन यांनाही ऐतिहासिक विषयाचे आकर्षण निर्माण झाले होते. परंतु त्यांचे ऐतिहासिक चित्रपट अगदी आधुनिक स्वरूपाचे होते—त्यातील समस्यांचा वर्तमानाशी मेळ बसविलेला होता. **अलेक्झांदर नेव्स्की** ह्या त्यांच्या अशा प्रकारच्या चित्रपटात क्वचिक दिग्दर्शन, प्रचंड नेपथ्य आणि भावदर्शी संगीत यांचा सुरेख संगम जमला होता. १३ व्या शतकातील जर्मन सरदारांविरुद्ध लढा पुकारणाऱ्या रशियनांच्या या चित्रकथेद्वारे दिग्दर्शक सर्गी आयजेन्स्टाइन, अभिनेते निकोलाय चेर्कासोव आणि संगीतदिग्दर्शक सर्गी प्रोकोफिएव यांनी आक्रमक योजना जोपासणाऱ्या जर्मन फॅसिस्टांना जणू इशारा दिला.

आयजेन्स्टाइन यांनी **भयंकर इवान** हा आपला चित्रपट युद्धकालातच पुरा केला. त्यातील तत्त्वांबाबत जरी अनेक मतभेद निर्माण झाले, तरी खुद्द आयजेन्स्टाइन यांना या चित्रपटामुळे चित्रपटविषयक अनेक समस्या सोडविण्यास मदत झाली.

**मिनिन आणि पोझार्स्की** व **सुवोरोव** हे ऐतिहासिक विषयावरील दोन चित्रपट व्सेवोलोद पुदोवकिन यांनी तयार केले. युक्रेनी जनतेच्या १७ व्या शतकातील मुक्ति-लढ्यावर आधारलेला अद्‌भुतरम्य पार्श्वभूमीवरील **बोगदान ख्मेल्नित्स्की** नामक चित्रपट इगोर सावचेन्को यांनी तयार केला. युद्धानंतर सावचेन्को यांनी अस्सल युक्रेनी विषयावर **तारास शेव्चेन्को** हा चरित्रात्मक चित्रपट तयार केला. या चित्रपटात त्यावेळी तरुण असलेल्या सर्गी बोंदारचुक या अभिनेत्याने नायकाची—महान् कवीची—भूमिका साकार केली आणि आपल्या भावी यशाची ग्वाही दिली.

केवळ क्रांतीमुळे—नव्या क्रांतिकारक दृष्टिकोनामुळे—इतिहासाची अनेक पाने पुन्हा नव्याने वाचणे शक्य झाले आणि रजतपटावर त्यांची पुनर्निर्मिती शक्य झाली.

श्रेष्ठ सोविएत चित्रपट-अभिनेते निकोलाय चेर्कासोव म्हणाले होते, " कलेच्या क्षेत्रात मी दीर्घ काळ व्यतीत केला आहे. सगळ्या वयस्कर माणसांप्रमाणे तरुणांबद्दल नापसंती व्यक्त करण्याची मला सवय आहे. म्हणून मी पडद्यावरील नट आणि पडद्यावरील वास्तवता ( माझ्या दृष्टीने या गोष्टी अविभाज्य आहेत ) यांचे समर्थन करतो असे नाही. आमच्या काळात चित्रपटाच्या व रंगभूमीच्या क्षेत्रांतील अत्यंत आगळ्या धारणांच्या दोरावरून मी व माझ्या सहकाऱ्यांनी कसरत केली आहे. तऱ्हेवाईकपणा, विदूषकी चाळे आणि चमत्कृती यांच्यामध्ये आम्ही वाहतच गेलो. आम्ही आमच्या डोक्यांवर उभे राहिलो, आश्चर्यकारक गोष्टी केल्या, आणि तरीही मी आणि माझे सहकारी कठोर वास्तववादाकडे वळलो. वास्तववादाचे हे तत्त्वज्ञान केवळ अपुरे नव्हते, तर प्रत्यक्ष अनुभवलेले होते, कलाप्रांतात उभी हयात घालवून मिळविले होते. वास्तववाद आणि नवे शोध—चित्रपटातील अत्यंत धाडसी शोध—यांचे समर्थन करण्याचा मला हक्क आहे. परंतु ते समर्थन मी फक्त वास्तववादी मार्गाने, समाजसत्तावादी वास्तववादाने करीन."

सर्गी आयजेन्स्टाइन यांनी लिहिले आहे, " मी आणि माझे सहकारी जे जीवन अनुभवतो त्याबद्दल मी कलावंत म्हणून वेगळे काही बोलणे कसे शक्य आहे ? त्यामुळे माझ्या मनात ज्या भावना निर्माण होतात त्याबद्दल मी निराळे काही बोलणार कसा ? मी जरी कम्युनिस्ट पक्षाचा सभासद नसलो, तरी ज्या जनसमुदायाने क्रांती घडविली व घडवीत आहे, भावना आणि विचार यांनी नव्या रशियाला संपन्न बनविले, त्या लोकांचा जोम आणि इच्छाशक्ती पाहून माझ्यात निर्माण झालेल्या भावनांचा अविष्कार करायला मी नकार देईन असा त्याचा अर्थ नव्हे. कलाकाराने स्वतःच्या काळाची नोंद घेणे हे योग्यच नव्हे का ? म्हणूनच मी म्हणतो की, सोविएत संघराज्यात क्रांतिकारी युगाची नोंद घेण्यापेक्षा दुसरे काहीही अधिक लायक नाही."

नवी सोविएत चित्रपटकला निर्माण करणाऱ्यांनी जे कार्य केले त्याचा नेमका आशय या दोन श्रेष्ठ कलाकारांच्या शब्दांमधून व्यक्त झाला आहे.

## जेव्हा तोफा धडाडल्या...

युद्धकाळामध्ये सोविएत चित्रनिर्मात्यांनी जी कामगिरी बजावली तिचे महत्त्व कितीही वाढवून सांगितले तरी ते कमीच ठरेल. रणवीरांच्या सामायिक थडग्यांमध्ये वार्तापटांचे अनेक छायाचित्रकार चिरविश्रांती घेत आहेत. सोविएत सैन्याची मर्दुमकी चित्रित करणारे वार्तापट अमोल किंमतीचे आहेत. आमच्या लोकांच्या शौर्याचे ते दस्तऐवज आहेत.

अत्यंत कष्टप्रद परिस्थितीत, अपुऱ्या साधनांनिशी आणि मर्यादित वीजपुरवठ्यावर अनेक चित्रनिर्मात्यांनी काम केले. अल्मा-अता आणि ताश्कंद येथील स्टुडिओमध्ये सतत काम चालू होते. सर्गी आयजेन्स्टाइन, अलेक्झांदर दोवझेन्को, वासिल्येव-बंधू, व्सेवोलोद पुदोवकिन, फ्रीड्रिच एर्मलेर, मिखाइल रॉम, सर्गी गेरासिमोव आणि इवान पीऱ्येव यांनी चित्रनिर्मिती चालू ठेवली.

मार्क दोन्स्कोय यांच्या **इंद्रधनुष्य** मधून एका धैर्यशील किसान-स्त्रीची कथा सांगितली आहे. नात्सींनी प्रदेश व्यापल्यावरही ती मोडून पडत नाही. हा चित्रपट अमेरिकेत दाखविला गेला. अत्यंत कठीण आणि तीव्र संघर्षाची ही कथा आहे. नात्सीवादाविरुद्ध लढताना आमच्या लोकांना कोणत्या कसोट्यांमधून जावे लागले, ते या चित्रपटात दाखविले आहे.

त्या काळात सोविएत जनतेच्या लष्करी मर्दुमकीच्या आणि रशियन वैशिष्ट्यांच्या कथा सांगणारे अनेक चित्रपट प्रदर्शित झाले. गेल्या दशकात निर्माण झालेल्या युद्ध-पटांच्या तुलनेने ते कमी असतील. परंतु फॅसिझमच्या शक्तीवर विजय मिळविता येईल हा विश्वास निर्माण करण्याच्या कार्यात त्यांनी फार महत्त्वाची भूमिका बजावली आहे.

१९४३ चा शरद्‌तू मला आठवतो. मी ज्या तांत्रिक पथकांना काम करीत होतो, त्या घनघोर लढाईनंतर थोड्या विश्रांतीसाठी आणि रसद घेण्यासाठी पुलाच्या तोंडापासून मागे आणल्या होत्या. युक्रेनमधील त्या चांदण्या रात्री नीपर नदीच्या तीरा-वरील एका खेड्यात आम्ही रणगाडा-सैनिक नुकतेच आघाडीवर आलेले नवे चित्रपट पहात असू. आमच्यापैकी अनेकांनी युद्ध सुरू झाल्यापासून चित्रपट पाहिला नव्हता. आम्ही अगदीत लीन होऊन **दोन सैनिक, जिल्हा-समितीचा चिटणीस, आमच्या गावचा मुलगा** आणि युद्धवार्तापट पाहिले.

अर्थातच, सगळेच प्रसंग काही वास्तववादी नव्हते. परंतु चित्रनिर्मात्यांच्या दोषांबद्दल आम्ही त्यांना माफ केले, कारण पडद्यावरील सोविएत सैनिक अगदी खरेखुरे भासत होते आणि आघाडीवर लढणाऱ्या लोकांबद्दल अतीव प्रेम व आदर या चित्रपटांमधून व्यक्त होत होता.

चित्रपट-समीक्षक नेया झोर्काया हिने युली रेझमान यांच्याविषयी निबंध लिहिताना, युद्धकालात त्यांनी पुऱ्या केलेल्या **माशेन्का** बद्दल केलेली समीक्षा हा उत्तम निरीक्षणाचा दाखला आहे.

" सामान्य, वर्णन न करण्याजोग्या आणि कोणतीही देणगी नसलेल्या माणसा-बद्दलची कल्पना—जनसमुदायातील माणसाबद्दलची सार्वसाधारण प्रातिनिधिक कल्पना—बदलण्याची आणि त्याच्यामध्ये त्या काळाचा प्रवक्ता म्हणून पाहण्याची कलात्मक

जरूरी ही आमच्या लोकांनी महान कोलांच्या पार पाडल्या त्याआधी किंवा नंतर, चालू युगाच्या वळणावर निर्माण झाली...समाजातून अत्यंत सूक्ष्म अशी पेशी बाजूला काढून व सूक्ष्मदर्शकयंत्राखाली तिची तपासणी करून संपूर्ण प्रचंड शरीरयंत्रणेच्या ताकदीबद्दल कला निष्कर्ष काढते.'

आम्ही असेही म्हणू शकतो की, ज्यावेळी जास्तीत जास्त संकटे येतात त्यावेळी ही आवश्यकता विशेष जोरदार स्वरूपात दिसते. महान् देशरक्षक युद्धातून साहित्यात निर्माण झालेली अत्यंत बहुरंगी व अपूर्व अशी वासिली त्योर्किन यांची व्यक्तिरेखा—अलेक्झांदर त्वार्दोव्स्की यांच्या दीर्घकाव्याचा नायक—याच आवश्यकतेच्या आधारावर निर्माण झाली नाही काय ? अतिशय सामान्य माणसाची भव्यता व धैर्य दाखविणे म्हणजे कल्पनाशक्तीला धोक्यात पाडणाऱ्या आत्मअपेक्षांना तोंड द्यायला समर्थ असलेल्या लोकांच्या मर्दुमकीचे गुणगान करणे होय.

आघाडीवर चित्रपट दाखविणे नेहमी शक्य नव्हते. लेख आणि कविता असलेली वृत्तपत्रे थेट खंदकांपर्यंत पोचविली जात होती. परंतु पडदा आणि प्रोजेक्टरची आवश्यकता असलेल्या चित्रपटाबाबत हे करणे शक्य नव्हते. तरीही, युद्धाच्या पहिल्या काही महिन्यांतील शोकांतिकांच्या अनुभवानंतरही, आपल्या भूमीवरून शत्रूला उखडून टाकण्याचे जवळजवळ अशक्यप्राय असे कृत्य करण्यासाठी मनोधैर्य प्रदान करण्याचे जे कार्य चित्रपटांनी केले, त्याचे मूल्यमापन करणे अशक्य आहे.

युद्धापूर्वी निर्माण झालेले चित्रपट सैनिकांना खूप आवडत.

**चापायेव, माक्झिमच्या तीन कथा, कोम्सोमोल्स्क, आम्ही क्रोन्स्टाटचे, सर्कस, ट्रॅक्टर ड्रायव्हर्स, बाल्टिकचा प्रतिनिधी, सरकारी सभासद, अखेरची रात्र** आणि **ऑक्टोबरमध्ये लेनिन** हे सारे चित्रपट म्हणजे एका सबंध पिढीला नागरिकत्व शिकविणारे विद्यापीठ होते. ज्या उद्दिष्टांचे आता हातांत बंदूक घेऊन रक्षण करावयाचे होते, त्या उद्दिष्टांवरील निष्ठेचे ते साधन होते. एक अपूर्व अशी घटना घडली होती. १९१७ च्या ऑक्टोबरपूर्वी जन्मलेल्या पिढीने किंवा नव्या पिढीनेही युद्धपूर्व कालातील चांगल्या चित्रपटांमधील नायकांकडे अद्भुतरम्य व्यक्तिरेखा म्हणून कधीही पाहिले नव्हते. या नायकांनी जीवनावर आक्रमण केले आणि त्याला व्यापून टाकले.

माक्झिमशी स्पर्धा सुरू झाली आणि चापायेवचे दाखले देण्यात येऊ लागले.

ग्रिगरी अलेक्झांद्रोव आणि इवान पीर्येव यांच्या विनोदी चित्रपटांमधील चुटके लोक वारंवार रोजच्या व्यवहारात वापरू लागले. **सर्कस** आणि **माशेन्का** मधील नायिकांमध्ये त्यांना आदर्श आधुनिक स्त्रीचे दर्शन घडले.

लढाईनंतर खंदकात जमल्यावर, आपण पाहिलेल्या चित्रपटांवर केलेली चर्चा व तो काळ आघाडीवरील सैनिक विसरणे शक्य नाही.

" मॅक्झिम बँकेत जातो तो प्रसंग आठवतो ? " एखादा तरुण सैनिक अशी सुरुवात करायचा.

" हिटलरवादी आपल्यावर तुटून पडत होते, तेव्हा सुरुवातीला त्यांना तोंड देणं मला जरा जडच गेलं, " दुसरा सैनिक बोलू लागे, " **चापायेव** मधल्या त्या प्रसंगाप्रमाणे जेव्हा शत्रूनं ' मानसिक हल्ला ' सुरू केला तेव्हा मी माझ्या मनावर ताबा मिळविला आणि शांत झालो.

हे शब्द एका घनघोर लढाईनंतर उच्चारले गेले आहेत. त्याठिकाणी लोकांनी हिटलरवाद्यांच्या अतिशय भयंकर अशा ' मानसिक ' हल्ल्याला अतुलनीय धैर्याने तोंड दिले होते.

सोविएत संघराज्याचे मार्शल बिर्युझोव यांनी १९४१ च्या उन्हाळ्यातील एक प्रसंग या ठिकाणी सांगितला आहे.

" शत्रू आग ओकीत असताना आम्हाला आमच्या पिछाडीच्या संरक्षण-फळीकडे नदीपार करून जायचं होतं. आमची यंत्रं वाचविण्याची शक्यता नसल्यानं आम्ही त्यांना आगी लावल्या आणि सोझ नदीच्या थंडगार पाण्यात उड्या घेतल्या. शत्रूनं आमच्यावर मागून हल्ला चढविला आणि आमच्या सभोवतालच्या पाण्यात बंदुकी-या गोळ्यांची कारंजी उडू लागली. हे अगदी **चापायेव** मधल्या प्रसंगासारखं घडलं, असा त्यावेळी माझ्या मनात विचार आला."

युद्धकालीन पिढीला आकार देण्यात युद्धपूर्व काळातील चित्रपटांनी फार मोठी महत्त्वाची भूमिका बजावली आहे, हे मी पुन्हा एकदा सांगतो.

लोकांना जे शांततामय जीवन ' जगायला ' मिळाले नव्हते, त्या जीवनाबद्दलचे प्रेम लोकांच्या या चित्रपटप्रेमात प्रतिबिंबित झाले होते. ज्या समाजाचा रजतपटावर विकास दाखविण्यात आला होता, त्या समाजात राहायला लायक होण्याची त्यांची इच्छा होती. जीवनावर पडलेल्या कलेच्या प्रत्यक्ष प्रभावाची ती अदृश्य प्रक्रिया होती.

युद्धकाळातही अंतःकरण हेलावून टाकणारे अनेक चित्रपट निर्माण होत राहिले. लोकांची सत्ता टिकावी म्हणून स्पेनच्या रणभूमीवर लढलेल्या व नंतर १९४१ मध्ये स्वदेशासाठी हाती शस्त्र घेतलेल्या माणसाची कथा **आमच्या गावचा मुलगा** मध्ये सांगितली आहे. कवी अलेक्झांदर त्वार्दोवुस्की यांच्या मते, ' वैभवासाठी नव्हे तर पृथ्वीवरील जीवनासाठी प्रत्यक्ष नरकात लढणाऱ्या ' खऱ्याखुऱ्या रणगाडासैनिका-प्रमाणे निकोलाय क्रयूच्कोव यांनी लुकोनिनची भूमिका वठविली आहे.

दिग्दर्शक लिओनिद लुकोव, पटकथालेखक येव्गेनी गाब्रिलोविच, अभिनेते बोरिस आंद्रेयेव आणि मार्क बर्नेस या सगळ्यांच्या प्रतिभेमधून जन्माला आलेले **दोन सैनिक** मधील नायक अतिशय लोकप्रिय होते. या चित्रपटातील गाणी आघाडीवर गाइली गेली, तशी पिछाडीवरही गाइली गेली. या चित्रपटातील ' तकलादू ' लढाईच्या प्रसंगांकडे, आघाडीवरच्या आयुष्याचे चुकीचे दर्शन घडविण्याकडे आणि इतर काही बारीक तपशिलाकडे प्रेक्षकांनी दुर्लक्ष केले. कारण त्यांना पडद्यावर प्रामाणिक आणि शूर माणसांचे दर्शन घडले होते.

त्या संकटकाळात निर्माण झालेल्या इतर युद्धपटांबाबतही हेच म्हणता येईल.

**मॉस्कोच्या सीमेवरील विजय** हा वार्तापट पाहिल्यानंतर आघाडीच्या सैनिकांना काय वाटत असे, ते मला अद्यापी आठवते. या विजयी प्रसंगाची अत्यंत वास्तववादी चित्ररूप पुनर्निर्मिती त्यांना पहायला मिळाली आणि लोकांच्या दुर्दम्य धैर्याची गाथा आघाडीपर्यंत पोहोचली.

युद्ध संपले त्यावेळी लोकांच्या मर्दुमकीच्या गोष्टी सांगणाऱ्या चित्रपटांचा महापूर येईल अशी अपेक्षा होती. पण अनेक कारणांमुळे तसे घडले नाही. उलट अनेक निराशावादी चित्रपट निर्माण झाले. सोविएत माणसांच्या शौर्याचे त्यात कुठेही दर्शन नव्हते. **बर्लिनचा पाडाव** हा असा एक चित्रपट होता. त्याच्या नायकाला कुठेही व्यक्तिमत्त्व नव्हते. ती एक पारंपारिक व्यक्तिरेखा होती, ते एक अमूर्त प्रतीक होते. या चित्रपटातून कलेची भूमिका आणि तिचे कार्य यासंबंधी पोथीनिष्ठ विचार प्रगट करण्यात आले होते. युद्धात आणि युद्धापूर्वी आमच्या चित्रपटांनी जे स्थान मिळविले होते त्याची ही ढळढळीत शरणागती होती.

त्याचवेळी असेही म्हणता येणार नाही की, सोविएत चित्रपटकलेच्या सर्वोत्तम परंपरा उंचावणारे चित्रपट अजिबात निघालेच नाहीत. उलट काही प्रशंसनीय चित्रपट निर्माण झाले. अलेक्झांदर फादेयेव यांच्या **तरुण रक्षक** नांवाच्या कादंबरीवर आधारित त्याच नांवाचा चित्रपट सर्गी गेरासिमोव यांनी निर्माण केला. तसेच बाह्यतः कमालीचा साधा वाटणारा, पण अतिशय आशयघन असा **लष्कराचा पुत्र** हा वलेंतिन कतायेव यांच्या पटकथेवर आधारलेला चित्रपट वासिली प्रोनिन यांनी दिग्दर्शित केला.

किंवा बोरिस बार्नेत यांचा **बालवीरांची मर्दुमकी** हा चित्रपट घ्या. हा चित्रपट साहसपटांमध्ये बहुधा सर्वोत्कृष्ट ठरेल. किंवा बोरिस पोलेवोय यांच्या कादंबरीवरील अलेक्झांदर स्तोलपर यांचा **खऱ्या माणसाची कथा** हा चित्रपट घ्या. तसेच फ्रान्समध्ये पारितोषिक मिळविणारा फ्रीड्रिच एर्मलेर याचा **मोठी मुसंडी** हा महत्त्वाचा नाट्यमय चित्रपटही आपण विसरू शकत नाही. अर्थातच, या चित्रपटातील उद्देश त्या वेळच्या

काळाला अनुसरून आहेत. परंतु महत्त्वाचे लष्करी प्रश्न सोडविणाऱ्या सैन्याधिकाऱ्यांच्या वास्तव चरित्रचित्रणात या चित्रपटाची निःसंशय मौलिकता दडली आहे. वर एका ठिकाणी उल्लेखिलेला इगोर सावचेन्को यांचा **तारास शेवचेन्को** हा चरित्रात्मक चित्रपट व ग्रिगरी रोशाल यांचा **मुसोर्ग्स्की** यांचाही या ठिकाणी उल्लेख करता येईल.

१९४० नंतरच्या दोन दशकात चित्रपटांची निर्मिती कृत्रिमरीत्या कमी केली गेली, तरी त्यामुळे त्यांच्या आशयात, स्वरूपात आणि नवनिर्मितीच्या गुणात कसलाही फरक पडला नाही.

१९५४ च्या सुरुवातीला संख्यात्मक व गुणात्मक दृष्टीने चित्रपटांची निर्मिती एकदम वाढली.

दरसाल निर्माण होणाऱ्या संपूर्ण लांबीच्या १०० चित्रापटांपैकी उत्तम कलाकृती म्हणून अनेकांचा उल्लेख करता येयील.

## वास्तववादी व्यक्तिचित्रण

सर्गी युत्केविच यांनी लिहिले आहे, "काही काही वेळा मला वाटते की, चित्रपट म्हणजे केवळ छायाचित्र नव्हे--तो केवळ रंगाबद्दलच संवेदनाक्षम असत नाही. आणखीही एक गोष्ट त्याच्यात आहे—पडद्यावरील सत्य किंवा फसवणूक आणि कलवंताची निष्ठा किंवा बेपर्वाई यांबद्दलची संवेदनाक्षमता. ज्याप्रमाणे कठोर वस्तुनिष्ठ आरशात नटाला त्याचा आत्मिक संकुचितपणा वा परिपूर्णता पहायला मिळते, त्याप्रमाणे चित्रपट तयार होत ना कलावंताने कोणत्या गोष्टींचा अनुभव घेतला ते प्रेक्षकाला पडद्यावर पाहता येते.

ऐतिहासिक सत्य आणि कलात्मक सत्य यांचा संपूर्ण सुसंवाद असलेले, कलावंतांनी नव्या गोष्टींचा कळकळीने पुरस्कार केलेले अलिकडच्या काळातील काही थोडे चित्रपट आपण वेगळे काढू शकू. १९२० नंतरच्या दोन दशकांतील चित्रपटविषयक परंपरांचे त्यांत केवळ प्रतिपादनच नाही, तर सोविएत समाजाच्या विकासाच्या नव्या अवस्थेमधील त्यांच्या संपन्नतेचेही दर्शन आहे. अनेक नवे तरुण चित्रनिर्माते उदयाला आले हा मुद्दा जरी महत्त्वाचा असला, तरी केवळ तेवढेच नाही. मुद्दा पुढच्या वाटचालीचा आहे, समाजसत्तावादी कलेच्या संपूर्ण आघाडीच्या प्रगतीचा व संपन्नतेचा आहे.

गेल्या दशकातील आमच्या चित्रनिर्मितीमध्ये भिन्न भिन्न शैलीच्या धारणा आहेत. **सैनिकाचा पोवाडा, बलाकमाला उडते आहे** आणि **माणसाचे दैव** अशा चित्रपटांमधून तिची कलात्मक पातळी सिद्ध झाली आहे. हे चित्रपट सोविएत संघराज्यात प्रदर्शित झाल्यानंतर ताबडतोब सगळ्या जगभर प्रदर्शित झाले. क्रांतिकारी सोविएत



‘ निळे नोंदणी-पुस्तक ’ या चित्रपटात
लेनिन यांच्या भूमिकेत कुझनेत्सोव
आणि वाय्. स्वेर्द्लोव याच्या भूमिकेत
ए. पलेयेस



' पोलंडमध्ये लेनिन ' या चित्रपटातील एक दृश्य.
लेनिन (भूमिका : माक्झिम श्त्राउख),
त्यांची पत्नी एन्. क्रुप्स्काया (भूमिका : एन्. लिस्यान्स्काया)
आणि येलिझावेता वासिल्येव्हना
(भूमिका : ए. पाव्लिचेवा) क्राको येथे असताना



'आशादायी शोकांतिका' या चित्रपटात
महिला-लोकमंत्र्याच्या भूमिकेत एम्. वोलोदिना
आणि जहाज-प्रमुखाच्या भूमिकेत व्ही. सफोनोव



' युद्ध आणि शांतता ' चित्रपटात.
बोरोदिनो येथील युद्धाचा प्रसंग

शेक्स्पीअरच्या ' हॅम्लेट ' या नाटकावरील
सोविएत चित्रपटात 'हॅम्लेट' च्या भूमिकेत
लेनिन–पारितोषिक–विजेता कलावंत
आय्. स्मोक्तुनोव्स्की

' गॅडफ्लाय् ' या चित्रपटात
'गॅडफ्लाय्'च्या भूमिकेत एन्. सिमोनोव



भारतात आलेला पहिला रशियन प्रवासी
अफनासी निकितिन आपल्या लेखनिकाला
सुलतानाच्या नावे पत्र लिहिण्यास सांगत आहे
(भूमिका : ओलेग स्त्रिझेनोव)



' इस्पीकची राणी ' या चित्रपटात
ओल्गा क्रासिना आणि ओलेग स्त्रिझेनोव

‘ पिता आणि पुत्र ’ या चित्रपटातील
एक प्रणयप्रसंग.
बझारोव (भूमिका : विक्तर अवृदुश्को)
आणि ओदिन्त्सोवा (भूमिका : ॲला लारिओनोवा)





'अॅना कारेनिना'
या चित्रपटातील एक दृश्य



'जंगली कुत्रा डिंगो'
या चित्रपटातील एक दृश्य



आर्मेन्फिल्म स्टुडिओ-निर्मित
'अहो, मी!'
या चित्रपटातील दृश्य

' तीन अधिक दोन '
या चित्रपटात रोमनच्या भूमिकेत
आन्द्री मिरोनोव
आणि झोयाच्या भूमिकेत
नतालिया फतेयेवा





' त्याचे नाव रॉबर्ट '
या चित्रपटात
ओलेग स्त्रिझेनोव
आणि मारियाना वेर्तिन्स्काया

' सात वारे ' या चित्रपटात
स्वेतूलानाच्या भूमिकेत
एल. लुझिना
आणि सुइदालेवच्या भूमिकेत
व्ही. तिखोनोव



'विक्तर चेर्निशेवच्या
जीवनातील तीन दिवस'
या चित्रपटातील दृश्य





' झाडे जेव्हा उंच होती ' या चित्रपटात
नताशाच्या भूमिकेत इना गुलाया
आणि कुझमाच्या भूमिकेत युरी निकुलिन



' दॉनची कथा ' या चित्रपटात
एक अत्यंत भावस्पर्शी प्रसंग.
दर्याच्या भूमिकेत लुद्मिला चुर्सिना

' दॉनची कथा ' या चित्रपटात
मशीनगनर शिबालोक आणि दर्या.
भूमिका अनुक्रमे येवगेनी लेओनोव
आणि लुद्मिला चुर्सिना



एक अंध मुलगी आणि दातो नावाचा मुलगा
यांच्या मैत्रीवर आधारलेल्या
‘ मला सूर्य दिसतो ’ या चित्रपटातील दृश्य.
भूमिका अनुक्रमे लैला किपिआने
आणि गेला चिचिनाद्झे

माक्झिम गोर्की स्टुडिओच्या
' रिझिक ' या चित्रपटातील दृश्य

' स्वागत ' या चित्रपटात (डावीकडून)
बोर्या देम्ब, एस्. ताकारेव आणि वाय्. बोन्दारेन्को



चित्रपटकलेतील उत्तम परंपरा दृढ होत असून त्यांना उत्तेजन मिळत आहे हे या चित्रपटांनी दाखवून दिले.

अलेक्सी बतालेव आणि तात्याना समोइलोवा यांनी भावस्पर्शी भूमिका केलेला **बलाकमाला उडते आहे** हा चित्रपट अद्‌भुतरम्य आहे. दिग्दर्शक मिखाइल कलातोझोव आणि छायाचित्रणकार सर्गी उरुसेवस्की यांनी अद्ययावत् साधनसामुग्रीच्या सहाय्याने तिसऱ्या दशकातील चित्रात्मक परंपरा यशस्वीरीत्या विकसित केली आहे. भावनांची एक विशिष्ट उंची गाठून कॅमेरा निवेदनात सहभागी झालेला पहायला मिळतो.

नायकाच्या मरणाच्या प्रसंगाचे उल्लेखनीय चित्रीकरण—ज्यावेळी त्याच्या अंधुक नजरेपुढे बर्चची झाडे गरगर फिरू लागतात आणि त्याच्या शेवटच्या भावना व्यक्त करण्यासाठी संगीत, ध्वनी व कॅमेरा यांचा कुशल वापर केला आहे त्या प्रसंगाचे चित्रीकरण—हे जागतिक सिनेमाशास्त्राच्या इतिहासातील सोनेरी पानांमध्ये दाखल झाले आहे.

सैनिक आघाडीवर जातात त्या प्रसंगीही असाच अनेक ध्वनींचा उपयोग करण्यात आला आहे. लोकांनी भरलेला मोठा चौक, सतत अनेक आवाजांचा घुमणारा ध्वनी, लष्करी आज्ञा, स्त्रियांचे हुंदके, निरोपाचे शब्द आणि वेरोनिकाचा तिच्या प्रियकराशी होणारा हृदयस्पर्शी वियोग—हे सर्व अत्यंत कौशल्याने व बुद्धिमत्तेचा वापर करून चित्रित करण्यात आले आहे.

या चित्रपटाने नैतिक प्रश्नांची मांडणी अगदी अचूकपणे आणि थोडक्यात केली आहे. या चित्रपटातील नायिकेचे—वेरोनिकाचे—पहिले प्रेम सुंदर पद्धतीने सांगितले आहे. एका कमकुवत क्षणी ती त्याचा विश्वासघात करते. तिचे दुःख, तिला आलेली जाणीव आणि तिचे शुद्धीकरण—या सगळ्या गोष्टी तात्याना समोइलोवाने प्रभावीपणे व्यक्त केल्या आहेत.

**बलाकमाला उडते आहे** ही केवळ एक प्रेमकथा नव्हे. या चित्रपटातील सर्व-काही भव्य, विस्तृत आणि भावदर्शी आहे. आवश्यक तेव्हाच काव्यात्म चित्रपटांच्या तंत्राचा दिग्दर्शक व छाया-चित्रणकारांनी उपयोग केला असला, तरी वास्तवतेपासून कधीही दूर जात नाहीत. सैनिकांना निरोप देण्याचा प्रसंग, नायक ज्याठिकाणी मरतो त्या आघाडीवरील जंगलातील प्रसंग, वेरोनिकाच्या हृदयपालटाला कारणीभूत ठरलेला इस्पितळातील प्रसंग, नायिकेला जिथे क्षुल्लकतेला आणि हिणकस वृत्तींना तोंड द्यावे लागते तो मेजवानीचा प्रसंग या सर्व गोष्टी बारीकसारीक तपशिलासह त्या काळाच्या पार्श्वभूमीवर चित्रित करण्यात आल्या आहेत.

मिखाइल शोलोखोव यांच्या कथेवर आधारलेला सर्गी बोंदारचुक दिग्दर्शित **माणसाचे दैव** हा चित्रपट वेगळ्या शैलीतून चित्रित करण्यात आला आहे. ही एका

रशियन सैनिकाची उदात्त कथा आहे. अत्यंत थोड्या शब्दांमध्ये तीव्रतेने भावना व्यक्त करणाऱ्या या चित्रपटात, त्या सैनिकावर कोसळणारी संकटे दाखविण्यात आली आहेत. अत्यंत सामर्थ्यवान माणूसही मोडून पडेल अशी संकटमालिका त्याच्यावर दैवामुळे कोसळते. परंतु या चित्रपटाचा नायक आंद्री सोकोलोव—ही भूमिका स्वतः सर्गी बोंदारचुक यानी साकारली आहे—ती सर्व संकटे धैर्याने पार करण्याची ताकद मिळवितो. फॅसिस्टांच्या कैदेत त्याला महाभयंकर यातनांचा अनुभव मिळतो, त्याचे तो आपले कुटुंब गमावतो [ लाल सैन्य बर्लिनवर तुटून पडते तेव्हा त्याचा मुलगा मरतो ], दुःखामुळे तो अकाली म्हातारा दिसू लागतो. पण त्यामुळे तो कठोर बनत नाही, लोकांबद्दलचे त्याचे प्रेम कमी होत नाही. तो त्याच्यासारखाच दुसरा एक अभागी प्राणी दत्तक घेतो—युद्धमार्गावर चुकलेले एक बेवारशी मूल.

हा चित्रपट म्हणजे मानवतावादाची गाथा आहे. म्हणूनच परदेशांतील प्रेक्षकांच्या अंतःकरणाला त्याची कथा भिडली.

ग्रिगरी चुखराय यांनी आपल्या पूर्वीच्या **एकेचाळीसावा** प्रमाणेच **सैनिकाचा पोवाडा** हा चित्रपट स्वतःच्या—कलावंताच्या—जीवनविषयक दृष्टिकोनातून तयार केला आहे. केन्स चित्रपट-महोत्सवात फेडरिको फेलिनी यांचा **ला डोल्से व्हिटा**, मायकेलांजेलो अंतोनिओनी यांचा **साहस** आणि इंगमार बर्गमन यांचा **उगमस्थान** या चित्रपटांबरोबर चुखराय यांचा **सैनिकाचा पोवाडा** दाखविण्यात आला. स्पर्धा सोपी नव्हती. विशेषतः फेलिनी यांचे चित्रपट क्रांतिकारी असतात. **ला डोल्से व्हिटा** सारखा प्रक्षोभक चित्रपट त्याला अपवाद नव्हता. लोकांच्या मनावर अधिराज्य गाजविणारे, ' दुसऱ्याला न सांगण्यासारख्या ' कल्पना, ' लोकांमधील विरक्ती ', संबंधाचे पृथकत्व आणि स्त्री-पुरुषांचे लैंगिक संबंध यांबद्दलचे विचार आपल्या चित्रपटांमधून मांडणारे व ते विशद करणारे म्हणून अंतोनिओनी आणि बर्गमन यांना पश्चिमी टीकाकारांनी डोक्यावर घेतले आहे.

चुखराय यांनी आपल्या चित्रपटात अगदी विरुद्ध टोकाचा विचार मांडला आहे. इथे संबंध तुटत नाहीत, दुव्यांचा अभाव नाही. सुंदर चित्ररूपी दृश्यांमधून मैत्री, दयाळूपणा आणि प्रेम याबद्दलच्या अगदी साध्या पण खऱ्या गोष्टी पहायला मिळतात.

जगातील दोन दृष्टिकोन आणि त्याच्यापुढील संभाव्यता यांचा नेहमीच संघर्ष होतो. सोविएत भूमीवरील अत्यंत संकटाच्या क्षणांचे, आमच्या लोकांनी काढलेल्या विलक्षण हालअपेष्टांचे चित्रण चुखराय यांच्या चित्रपटात आहे. तरीही त्यात कुठेही निराशावाद नाही किंवा पशुत्व दिसत नाही. उलट मानवतावादाचा स्त्रोत जोरदारपणे त्यातून वाहताना दिसतो.

एक पोरगेला तरुण सैनिक शत्रूचा एक रणगाडा निकामी करतो. या त्याच्या मर्दुमकीबद्दल त्याला छोटीशी रजा मिळते. आपल्या गावी घरी जावे आणि घराचे मोडलेले छप्पर दुरुस्त करायला आईला मदत करावी या उद्देशाने तो निघतो. युद्धाने उद्‌वस्त झालेल्या मार्गावर त्याची एका मुलीशी भेट होते. विध्वंसाच्या वादळाने तिचे आयुष्य पार विस्कटून गेलेले असते. आल्योशा आणि शुरा ही दोघेही इतर सर्वसामान्य तरुण-तरुणींप्रमाणेच असतात. पण ती दोघं पवित्र आणि सामर्थ्यवान असतात व जगाकडे पवित्र व सरळ दृष्टीने पाहतात !

आघाडीवरून परतताना आल्योशाला मानवी स्वभावाच्या सगळ्या प्रकारच्या छटा पहायला मिळतात—क्षुद्रपण, विश्वासघात, कळकळची दोस्ती. तो अधिक बलवान होतो, शहाणा होतो आणि शुद्ध बनतो.

पुढील प्रसंग हा चुखराय यांच्या कलात्मक शोधाच्या स्वरूपाचे वैशिष्ट्य व्यक्त करणारा आहे. स्टेशनवर आल्योशाला एक पाय गमावलेला सैनिक भेटतो. एकेकाळी भक्कम बांध्याचा आणि ठाम विचारांचा तो माणूस आता विकल बनलेला असतो व भवितव्याविषयी त्याला काळजी वाटत असते. त्याची बायको त्याचे स्वागत कसे करील ? युद्धापूर्वी त्यांच्यात मतभेद झालेले असतात. आल्योशा आणि तो सैनिक फलाटावर उतरतात तेव्हा तिथे चिटपाखरू नसते. ती आलेली नसते. दुर्लौकिकाचा हा नमुना पाहून आल्योशाची मान शरमेने खाली झुकते. एवढ्यात कारखान्याच्या आवारातून एक बाई फलाटावर धावत ओरडत येते "वास्या !" आल्योशा समाधानाचा निःश्वास टाकतो. सगळेच काही गमावले नाही— या पृथ्वीवर अद्याप न्याय नावाची चीज शिल्लक आहे.

केन्स महोत्सवातील निवडक प्रेक्षकांनाही चुखराय यांच्या चित्रपटाने चकित केले. नंतर सगळ्या जगभरच्या रजतपटांवर त्याने दिमाखाने वाटचाल केली आणि अनेक देशांतील लोकांनी सोविएतांच्या भूमीतील या शूर पुत्रांची स्तुति कवने गाइली.

**माणसाचे दैव** आणि **सैनिकाचा पोवाडा** यांचे प्रदर्शन म्हणजे चित्रपट-कलेच्या आघाडीवरील मोठा विजय होता.

युद्धामधून निर्माण होणारे नैतिक प्रश्न हाताळणारे दुसरेही काही चित्रपट निर्माण झाले. त्यांपैकी बहुसंख्य चित्रपटांनी वैचारिक वादळे निर्माण केली त्या काळातील घटनांबद्दल अनेकांनी ऐतिहासिक दृष्टिकोनाचा अभाव दाखविला. काहींनी शौर्यावर अगदी थोडा भर दिला. परंतु लेव कुलिद्‌जानोव आणि याकोव सेगेल यांचा **माझे घर**, युली रेझमान यांचा **कम्युनिस्ट**, मिखाईल श्वायत्सर यांचा **दुसऱ्याचे नातेवाईक**, स्तानिस्लाव रोस्तोत्स्कींचा **पेन्कोवोत घडलेली गोष्ट**, आयोसिफ खीफित्झ यांचा **मोठे कुटुंब**, सर्गी गेरासिमोव यांचा **स्वच्छ वाहते दॉन**, आंद्री तार्कोवस्कींचा **इवनाचे**

**वालपग**, जॉर्जी दानेलिया आणि इगोर तालान्किन यांचा **सेर्योझा** व युली येगोरोव यांचा **सामान्य कथा** या चित्रपटांमधून सोविएत माणसाचा मानवतावाद, विविधगुणी सोविएत व्यक्तिरेखा यांची अभिव्यक्ती घडली.

मानवतावाद हा आमच्या कलेच्या मूलभूत दृष्टिकोनांपैकी एक आहे.

मानवतावादाच्या विरोधकांनी निर्माण केलेल्या खोट्यानाट्या गोष्टींशी आणि या विचाराचा वेगळा अर्थ लावणाऱ्यांशी किंवा हीमूळ कल्पनाच नाहीशी करणाऱ्यांशी आमचे कट्टर शत्रुत्व आहे. शौर्यपूजेला विरोध करणाऱ्या तथाकथित धारणांपासून, निसर्गात उदात्त असे काहीच नाही अशा प्रतिपादनांपासून, सगळी माणसे एकसारख्या स्वभावाची असतात, प्रत्येकाला जगायला हवे असते, जो तो मरणाला भितो आणि लोक ज्याला मर्दुमकी म्हणतात ती केवळ परिस्थितीच्या जबरीमुळे करावी लागणारी कृती असते, अशा विचारांपासून सोविएत कला दूर आहे.

अशा प्रकारच्या चित्रपटांबद्दल एखाद्याला आश्चर्यच वाटेल. फॅसिझमविरुद्ध लढलेल्या लाखो रशियन, फ्रेंच, पोलिश, इटालियन, युगोस्लाव, चेक, ब्रिटिश व अमेरिकन लोकांशी या चित्रपटांमधील 'नायकांचे' काय साधर्म्य असेल हीही आश्चर्य करण्याचीच बाब आहे.

इतिहास आणि फॅसिझमविरोधी लढा यांबाबतच्या दृष्टिकोनांना **सैनिकाचा पोवाडा, बलाकमाला उडते आहे, माणसाचे दैव** आणि इतर अनेक परदेशी वास्तववादी चित्रपटांनी विरोध केला आहे हे सागण्याची गरज नाही. ध्येयांवरील निष्ठेचे ते गुणगान करतात—अश्रद्धेचे नव्हे, मानवतावादाची स्तुती करतात—मानवजातीच्या द्वेष्ट्यांची नव्हे, जीवनातील सत्य जोपासतात – केवळ काल्पनिक योजना नव्हेत.

कोन्स्तन्तिन सिमोनोव यांच्या कादंबरीवर आधारित अलेक्झांदर स्तोल्पेर यांचा **जिवंत आणि मृत** हा चित्रपट फॅसिझमविरोधी लढ्याचा विषय हाताळणारा म्हणून सोविएत चित्रपटांच्या दृष्टीने अत्यंत महत्त्वाचा आहे.

**माणसाचे दैव, सैनिकाचा पोवाडा** या आणि इतर चित्रपटांमधून उदात्त विषयाचा एक दृष्टिकोन दाखविण्यात आला आहे, संकटाच्या अत्यंत वाईट क्षणी आपल्य देशाच्या रक्षणार्थ लढणाऱ्या लोकांची नैतिक विशुद्धता दाखविली आहे. यातच या चित्रपटांचे अक्षय महत्त्व दडले आहे.

**जिवंत आणि मृत** हा चित्रपटच वेगळ्या प्रकारचा आहे. त्यात आमचे सैन्य, त्याचा दिमाख, सत्ता, मानवतावाद पहायला मिळतो, अतिशय वाईट परिस्थितीतही फॅसिस्ट झुंडींना थोपवून त्यांचा नाश करणारी लोकांची सेना पहायला मिळते. हा चित्रपट म्हणजे मानसिक विश्लेषण नव्हे, की युद्धकथा नव्हे. जागतिक युद्धाच्या वावटळीत

सापडलेल्या लोकांचे—आमच्या देशावर कोसळलेल्या आपत्तीचे—ते चित्ररूप दर्शन आहे.

**जिवंत आणि मृत** चा एवढा गौरव कां झाला? हा चित्रपट ज्या ठिकाणी प्रदर्शित होतो, तेथे लांबलचक रांगा कां लागतात? कारण उघड आहे. चित्रपटप्रेमी मंडळींना ज्या पहायची उत्कंठा होती—युद्धाच्या पहिल्या अवस्थेतील वास्तव चित्रण, १९४१ च्या शरद ऋतूमध्ये घडलेल्या घटनांचा कलात्मक आविष्कार—त्या गोष्टी या चित्रपटात पहायला मिळाल्या. कालच्या सैनिकांनी आपापल्या व्यक्तिरेखा ओळखल्या. तरुणांनी आपल्या वडिलांना, मोठ्या भावांना ओळखले. त्या लोकांनी स्वतःला पत्रकार सिन्त्सोवमध्ये पाहिले; स्वतःचा शोक आवरून देशाबद्दलचे कर्तव्य व जबाबदारी पार पाडणाऱ्या जनरल सेर्पिलिनमध्ये पाहिले. लढाईचा दर्जा राखणाऱ्या सार्जंट मेजरमध्ये त्यांनी स्वतःला पाहिले. 'ज्याच्यावर सारा रशिया विसंबला' त्या रणगाडा-दलातील इवानोवमध्ये स्वतःला पाहिले.

रणगाडा-दलातील या सैनिकावरील प्रसंग बारकाईने पाहण्यासारखा आहे. आपल्याला माहीतच आहे की, १९४१ च्या शरद ऋतूमध्ये मॉस्कोच्या सीमेवरील परिस्थिती गंभीर होती. शत्रूची भयप्रद आगेकूच कुणाला थांबविता येईलसे वाटत नव्हते. पण तशी एक शक्ती निर्माण झाली. सतत परिस्थिती बदलणाऱ्या त्या काळात—दुःखद माघारी घ्याव्या लागलेल्या आणि मोठ्या बदलाची तयारी कराव्या लागलेल्या त्या काळात—सिन्त्सोवला जंगलात भेटलेला रणगाडासैनिक इवानोव हा त्या काळातील वैशिष्ट्यपूर्ण व्यक्ती होती. ओलेग येफ्रेमोव यांनी यात्यांच्या इवानोवमधून जीवनाला वेगळे वळण लावणाऱ्या गुणाची—टिकून राहण्याच्या ताकदीची अभिव्यक्ती घडविली. माणसे इतस्ततः पसरली होती, जंगलांतून वाट काढीत होती, शत्रूची रसद ज्यावरून जाई त्या रस्त्याच्या कडेकडेने वावरत होती. काही अगदी निराश झाले होते. काही काही वेळा असे वाटत होते की, या येणाऱ्या झुंडींना पृथ्वीतलावर कुणीही अडवू शकणार नाही.

एकाएकी त्या जंगलामध्ये एका ओंडक्यावर बसून एक रणगाडा-सैनिक शांतपणे आपल्या सहकाऱ्यांना आज्ञा देत असलेला आपल्याला दिसतो. त्याच्या आवाजातून त्याच्या सामर्थ्याचा प्रत्यय येतो. आपण काय करीत आहोत याची त्याला पूर्ण जाणीव आहे. थंडपणे आणि आत्मविश्वासाने तो विखुरलेल्या लोकांना पुन्हा एकत्र आणतो, त्यांचे गमावलेले धैर्य त्यांना पुन्हा मिळवून देतो आणि जोरदार प्रतिकाराची तयारी करतो.

सेर्पिलिन आणि इवानोव यांसारख्या युद्धाची जाण असलेल्या लोकांच्या नेतृत्वामुळे अजिंक्य असे सैन्य निर्माण झाले. या चित्रपटाच्या निर्मात्यांना इतिहासामध्ये याचा

दाखला मिळाला आणि १९४१ मधील शरदात काय घडले, मॉस्कोच्या सीमेनजीक कोणता ‘ चमत्कार ’ घडला ते त्यांनी समजावून सांगितले.

या चित्रपटात त्या काळातील विशिष्ट घटनांचे नेमके चित्रण करण्यात आले आहे. ब्रेस्तपासून शेकडो किलोमीटर अंतर तोफा खेचून नेणारा गोलंदाजांचा जथा, जळणाऱ्या खेड्यातील लोकांना वाचविण्यासाठी प्रतिचढाई करीत कमरेभर बर्फातून मैदान तुडवीत जाणारे सैनिक इत्यादी.

‘ त्यांना ठाऊक नव्हते... ’ हे लेखकाचे शब्द संबंध चित्रपटभर प्रतिध्वनित होत राहतात. आणि आपण पाहतो की, बाल्तिकपासून काळ्या समुद्रापर्यंत पसरलेल्या आघाडीवर काय चालले आहे त्याची लोकांना कल्पना नव्हती, दुसऱ्या दिवशी त्यांचे काय होईल हे त्यांना माहीत नव्हते. तरीही सोविएत समाजाच्या ध्येयांवर निष्ठा ठेवून त्यांनी स्वतःला साजेसे आपले कर्तव्य पार पाडले.

**माणसाचे दैव, सैनिकाचा पोवाडा, बलकमाला उडते आहे** आणि **जिवंत व मृत** हे सगळे चित्रपट म्हणजे सोविएत माणसाच्या ताठर व्यक्तिमत्त्वाच्या संपूर्णतया सत्यकथा आहेत, सोविएत सैनिकाचा दयाळूपणा आणि त्याचे आत्मिक वैभव दाखविणाऱ्या मनोविश्लेषणात्मक कथा आहेत. काव्यमय पार्श्वभूमीवरील ह्या चित्ररूप कादंबऱ्या आहेत.

हे सगळे चित्रपट पुन्हा एकदा सोविएत चित्रनिर्मात्यांमधील उत्कृष्ट सुप्त गुण दाखवितात, त्यांचे संपन्न रंगभांडार दाखवितात. ‘ सर्जनशील बळजबरी ’ ची भाषा ते खोटी पाडतात. माणसांशी आणि सत्याशी निष्ठा ठेवणारा कलावंत हा जीवनातील अत्यंत गुंतागुंतीच्या आणि व्यापक प्रश्नांची हाताळणी सहज करू शकतो.

## भिन्न भिन्न शैली

युद्धोत्तर काळात उदयाला आलेल्या तरुण चित्रपटदिग्दर्शकांच्या सबंध पिढीने आपापल्या पद्धतीने सोविएत चित्रपटविषयक परंपरा आणखी उंचावल्या. विषय, शैली आणि धारणा अशा सगळ्या दृष्टींनी त्यांचे चित्रपट भिन्न भिन्न होते.

लेव कुलिद्‌जानोव आणि याकोव सेगेल यांच्या **माझे घर** ने युद्धाच्या वावटळीत सापडलेल्या माणसांचे जीवन आणि त्या काळातील तपशीलवार बारकावे दाखविले. आंद्रेसी तार्कोव्स्कींच्या **इवानचे बालपण** या युद्धपटाने चित्रपटविषयक-प्रकाराकडे पाहण्याची एक नवी भावना आविष्कृत केली. कॅमेरा आणि ध्वनी यांचा विविध आणि स्वतंत्र बुद्धीने वापर केलेला होता. त्यांचा हा चित्रपट म्हणजे माणूस आणि युद्ध यांच्यामधील चित्रपट-रूपक होते.

याउलट, स्तानिस्लाव रोस्तोत्स्की यांच्या **पेन्कोवोत घडलेली गोष्ट** मध्ये ग्रामीण जीवनातील संघर्षावर अधिक भर दिला आहे. एल्दार र्‍याझानोव यांच्या चित्रपटांनी जीवनातील रंजक भागांचा, उपहासयोग्य गोष्टींचा वेध घेतला. त्यांच्या **चैनीची रात्र** या संगीतमय चित्रपटात हे स्पष्टपणे दिसले या चित्रपटात चित्रपट–रंगभूमीवरील श्रेष्ठ अभिनेते इगोर इलियन्स्की यांनी नोकरशाहीची अत्यंत कौशल्याने टिंगल उडविली आहे. अशाच प्रकारचा विषय इनोकेंती स्मोक्तुनोव्स्की यांची भूमिका असलेल्या **मोटारीच्या शोधात** मध्ये हाताळला गेला आहे.

मार्लिन खुत्सियेव यांचा **माझे वय २०** हा चित्रपट त्यातील काळ व मानव यांच्यावरील चिंतन, नगराच्या जीवनाची अचूक नोंद घेण्याची क्षमता, तरुणांच्या भावनांचा नेमका वेध या गोष्टींमुळे वैशिष्ट्यपूर्ण ठरला आहे. माणसाचे आकर्षक गुण वेगळे काढून दाखविण्याची ताकद जॉर्जी दानेलिया यांच्या **मी मॉस्कोत फिरतो** मध्ये दिसून येते.

लेव कुलिद्जानोव यांच्या **जेव्हा झाडे मोठी झाली** आणि **बाबांचे घर** या चित्रपटांमध्ये गुंतागुंतीच्या नैतिक संघर्षांची गुंफण केली आहे. अलेक्झांदर अलोव आणि व्लादिमीर नावूमोव यांच्या **पावेल कोर्चागिन** व **नवगतांसाठी शांतता** या चित्रपटांमध्ये आमच्या देशाचा इतिहास सांगितला गेला आहे. त्यांच्या चित्रीकरणात ठसठशीत अलंकारिक शैलीकडे व धारदार, सुशोभित प्रकाशाकडे थोडा अधिक कल झुकलेला आढळतो.

इगोर तालान्किन आणि जॉर्जी दानेलिया यांच्या जगप्रसिद्ध **सेर्योझा** मध्ये आणि दानेलिया यांच्या **ओळख** मध्ये लवचिक उपाय, अपूर्व प्रतीके आणि आकर्षक व्यक्तिचित्रण यांच्यावर भर देण्यात आला आहे. चित्रपटदिग्दर्शक व लेखक वासिली शुक्शिन [ व्हेनिस महोत्सवात पारितोषिक मिळविलेला **तिथे असा एक माणूस आहे** आणि **तुझा मुलगा व भाऊ** ] यांनी जीवन, मानसशास्त्र आणि ग्रामीण जनतेमधील नैतिक मूल्ये यांच्याकडे अधिक लक्ष दिले आहे.

सॅम्सन सामसोनोव यांचा **आशावादी शोकांतिका** म्हणजे क्रांतिवीरांचे गुणगान करणारे गीत आहे. किर्घिझियातील सोविएत सत्तेच्या पहिल्या काळाचे चित्रण करणाऱ्या आंद्री कोन्चालोव्स्की यांच्या **पहिला शिक्षक** या चित्रपटात जीवन, चालीरीती व सामाजिक संघर्ष यांची सूक्ष्म गुंफण करून क्रांतीचा व लोकांचा प्रश्न सोडविलेला आहे.

युली येगोरोव आणि मिखाइल स्वायत्सर यांच्या चित्रपटांमधील दैनंदिन जीवनाचे चित्रण, अलेक्झांदर मित्ता यांच्या चित्रपटांमध्ये गुंफलेले बालमानसशास्त्र [**घंटा वाजली, दार उघड** या त्यांच्या चित्रपटाला व्हेनिस बालचित्रपट महोत्सवात सेंट मार्कचे

गोल्डन लायन पारितोषिक मिळाले ], **विस्मृत पूर्वजांच्या सावल्या** मधील सर्गी पारद्जानोव यांच्या कल्पनांची झेप, एक तरुण आणि बहिरी-मुकी मुलगी यांच्या विशुद्ध प्रेमाची कहाणी सांगणाऱ्या तरुण दिग्दर्शक मिखाइल बोगिन यांच्या **दोघे** मधील काव्यात्मकता, अलेक्सी साल्तिकोव यांनी **अध्यक्ष** मध्ये चितारलेला कठोर वास्तव-वाद—या सगळ्या आणि इतर बहुसंख्य चित्रपटानी सोविएत चित्रनिर्मात्यांची नवी पिढी काय करू शकते ते दाखवून दिले. सोविएत चित्रपट-स्टुडिओंमध्ये नव्याने कामाला लागलेल्या चित्रपट-दिग्दर्शकांची संख्या हळूहळू वाढत आहे ही समाधानाची बाब आहे. १९६५ मध्ये ती २० पेक्षा अधिक होती, १९६६ मध्ये ती ३० हून अधिक झाली.

ज्यांनी सोविएत चित्रपटांची परंपरा निर्माण केली त्या जुन्या-जाणित्या दिग्दर्शकां-नीही अभिव्यक्तीच्या मध्यमाचे नवे शोध थांबविले नाहीत.

लेनिन यांच्याविषयी अभिजात चित्रपट निर्माण करणारे आणि अनेक चित्रपट-दिग्दर्शकांचे शिक्षक मिखाइल रॉम यांनी अगदी नव्या धर्तीचा **एक वर्षातील नऊ दिवस** हा चित्रपट निर्माण केला. भाषा, रिवाज आणि अभिनय या बाबतीत आधुनिक असलेल्या या चित्रपटात चित्रपटातील नव्या सिद्धी सृजनशीलतेने विकसित झालेल्या होत्या.

एका वर्षातील नऊ दिवसांची त्यांनी निवड केली आणि दोन तरुण वैज्ञानिकांच्या शास्त्रीय शोधांची कथा सांगितली. सामाजिक आणि नैतिक संबंधांच्या विस्तृत पार्श्वभूमीवर त्यांनी शास्त्रीय समस्या हाताळल्या. त्यांचा हा चिंतनपर चित्रपट म्हणजे चित्ररूपी वादविवाद आहे.

नंतर त्यांनी क्रुद्ध भावनावेगाने भारलेला **सामान्य फॅसिझम** हा प्रचारकी चित्रपट निर्माण केला. हा अनुबोधपटवजा चित्रपट धारदार निवेदनामुळे प्रभावी बनला आहे.

चित्रपटदिग्दर्शक, सैद्धांतिक आणि शिक्षक असलेल्या सर्गी गेरासिमोव यांनी युद्धपूर्व कालातच स्वतःची शैली आणि जीवनविषयक दृष्टिकोन घडविला, आणि त्याच वेळी अविष्कारामध्ये संपूर्णपणे नैसर्गिकता साध्य केली. युद्धोत्तर काळात त्यांनी तरुणांच्या युद्धातील मर्दुमकीच्या कथा सांगणारा **तरुण रक्षक** नावाचा चित्रपट निर्माण केला; तसेच शोलोखोव यांच्या **संथ वाहते डॉन** या विख्यात कादंबरीला राजपटावर आणले व **माणसे आणि पशू** हा मानसशास्त्रीय चित्रपट निर्माण केला.

युद्धापूर्वी विनोदी चित्रपटांची मालिका निर्माण करणाऱ्या इवान पीर्येव यांनी दोस्तोयेवस्की यांच्या **'वेडा'** या कथेवर चित्रपट तयार केला.

तपशिलाची जाण, सुरेख अभिनय आणि विचारपरिप्लुत वास्तववादी दिग्दर्शन यांचा अविष्कार घडविणाऱ्या युद्धपूर्व कालातील **अखेरची रात्र** आणि

**माशेन्का** या चित्रपटांचे कर्ते युली रेझमान यांनी आता **कम्युनिस्ट** निर्माण केला. स्वतःच्या गरिबीकडे दुर्लक्ष करून लोकांच्या व क्रांतीच्या सेवेसाठी स्वतःला वाहून घेणाऱ्या, भविष्यकालाकडे आशावादी दृष्टीने पाहाणाऱ्या एका सामान्य कामगाराची—वासिली गुबानोवची—जोमदारपणा व सत्य यांबाबत सोविएत चित्रसृष्टीत अजोड ठरलेली व्यक्तिरेखा तरुण अभिनेते येवगेनी उर्बान्स्की यांनी साकार केली आहे. रेझमान यांची अलिकडच्या काळातील आणखी एक प्रमुख कलाकृती म्हणजे **प्रेम असले म्हणून काय झाले ?** ही होय. हा विशाल चित्रपट वेगळ्या धर्तीचा आहे. अडाणीपणा आणि औपचारिकता यांविरुद्ध त्याचा रोख आहे. सामान्य मुलाच्या प्रेमात एक मुलगी पडते. तिच्या या प्रेमाबद्दल तिच्या शिक्षकांची प्रतिक्रिया हा या चित्रपटातील संघर्षाचा विषय आहे. त्यांच्या सर्वच चित्रपटाप्रमाणे यातील भूमिका उच्च दर्जाच्या वठल्या आहेत.

याच काळात, सोविएत चित्रसृष्टीचे एक संस्थापक ग्रिगरी कोझिन्त्सेव यांनी **डॉन क्विक्झोट** व **हॅम्लेट** या सुंदर कलाकृती रजतपटावर आणल्या.

निकोलाय चेर्कासोव यांच्या अभिनयाने नटलेल्या **डॉन क्विक्झोट** ने जगातिल रजतपटांची प्रदक्षिणा पुरी केली. इनोकेंती स्मोक्तुनोव्स्की यांनी साकारलेल्या **हॅम्लेट** चा अनेक देशांवर खोल ठसा उमटला.

दिवंगत अलेक्झांदर दोवझेन्को यांच्या पत्नीने—युलिया सोल्न्त्सेवा हिने—**सागराची कविता, ज्वालांमधील वर्षे** आणि **भारलेली देस्ना** हे ७० मिलिमीटरमधील हे रंगीत चित्रपट तयार केले. दोवझेन्को यांची काव्यात्मकता व त्यांचे देशप्रेम तसेच राखून, त्यांच्या कथानकांचा उपयोग करून तिने हे चित्रपट निर्माण केले.

आमच्या काळात निर्माण केलेल्या **मोठे कुटुंब** आणि **रुम्यान्त्सेवमध्ये घडलेली कथा** या चित्रपटांनंतर आयोसिफ खीफित्झयांनी चेखोव यांच्या **कुत्रा घेतलेली सरदारीण** या कथेवर चित्रपट काढला. हा चित्रपट जगात अनेक ठिकाणी दाखविण्यात आला. चेखोव यांच्या **आयोनिच** नामक दुसऱ्या एका कथेवर खीफित्झ यांनी एक चित्रपट नुकताच पुरा केला आहे.

युध्दापूर्वी गोर्कींच्या तीन कथांना रजतरूप देणाऱ्या मार्क दोन्स्कोय यांच्या चित्रपटांनी• जगाला नवा साक्षात्कार घडविला [ पुदोवकिन आणि दोन्स्कोय यांना अिटालियन नव-वास्तववादी आपले आत्मिक गुरू मानतात ]. त्यांनी अद्यापी गोर्की यांच्या साहित्यावर चित्रनिर्मिती चालू ठेवली होती. नंतर त्यानी **इंद्रधनुष्य, खेड्यातील डॉक्टर हे** आणि लेनिन यांच्या कुटुंबावरील चित्रपट तयार केले.

फ्रीड्रिश एर्मलेर, ग्रिगरी रोशाल, अलेक्झांदर इवानोव, सिको दोलिद्झे, तिमोफी लेवचुक, वासिली प्रोनिन, कमिल यर्मातोव, अलेक्झांदर झार्गी यांचे चित्रपट आणि अलेक्झांदर प्तुश्को अलेक्झांदर रो व इल्या फ्रेझ यांनी काढलेले बाल-चित्रपट हे सगळे शैली, विषय आणि दृष्टिकोन यांबाबतीत वेगवेगळे, परंतु जुन्या पिढीतील चित्रपट-दिग्दर्शकांनी केलेल्या शोधांचे वैशिष्ट्य दाखविणारे होते.

सोविएत चित्रपटांनी खऱ्याखुऱ्या नायकांना उठाव दिला. खंबीर स्वभावाची, जबर ताकदीची आणि ध्येयासाठी कुठल्याही अडचणींना तोंड देण्याची तयारी असलेली माणसे रजतपटावर साकारण्यात आली. हे नायक म्हणजे केवळ आदर्श कल्पना किंवा 'स्वयंचलित माणसे' नव्हती. त्यांनी जीवन अनुभवले होते, काम केले होते, प्रेम केले होते, दुःख भोगले होते आणि वणवण केली होती. त्यांचे आंतरिक जग श्रीमंत होते. मनाने ते बळकट होते. ते आशावादी नायक होते.

अनेकवेळा आम्हाला एक मत प्रदर्शित केलेले ऐकायला मिळते : आशावादी किंवा निराशावादी नायकांबद्दल चर्चा कशाला ? केवळ माणसांबद्दल कां बोलत नाही ? त्यांच्या अत्यंत गुंतागुंतीच्या आणि विरोधाभासाने भरलेल्या स्वभावाविषयी कां बोलत नाही ? 'आशावादी नायका'च्या कल्पनेला विरोध दर्शवून काही टीकाकार असे जाहीर करतात की, नायकाच्या नैतिक गुणांच्या या थोडक्या पात्रतेमुळे दुफळी पडते. परंतु चापायेव हा आशावादी किंवा विधायक नायक अजिबात फूटपाड्या नाही ! त्याच्या दोषांच्या भडक रंगासह त्याला चित्रित करण्यात आले आहे.

समाजसत्तावादी मानवतावादाचे आम्ही कैवारी माणसाला मूल्य आहे ही कल्पना नाकारू शकत नाही. लाचखोर आणि उदात्त व्यक्तिमत्त्वामधील फरक आम्ही पुसून टाकू शकत नाही. चांगले आणि वाईट, उच्च आणि नीच, उदात्त आणि क्षुद्र यांच्या विभागणीच्या बाजूने आम्ही आहोत. अलेक्झांदर फादेयेव यांनी म्हटले आहे की, "जुन्या मानवतावादाप्रमाणे पाहता 'तुम्ही काहीही केलेत तरी मला सारखेच आहे. तुम्ही मनुष्यप्राणी आहात ही त्यातील महत्त्वाची गोष्ट आहे.' समाज-सत्तावादी मानवतावादाप्रमाणे पाहता 'तुम्ही काहीच केले नाही तर मला तुमच्यात माणूसच दिसत नाही. मग तुम्ही कितीही हुषार आणि दयाळू असलात तरी त्याचा उपयोग नाही.'"

आमचा मानवतावाद लढाऊ प्रवृत्तीचा आहे. अदृश्य गुणांवरील दुबळ्या कारणमीमांसेला तो विरोध करतो. जुन्या जगातील विकृतीविरुद्ध आणि आत्मप्रेमाविरुद्ध केलेल्या लढ्यात खरेखुरे सुख जिंकले आहे असे त्याचे म्हणणे आहे. **आशावादी शोकांतिका** मधील महिला-कोमिसारचा हा मानवतावाद आहे. एका बंडखोर

खलाशांच्या तुकडीचे ती शिस्तबद्ध क्रांतिकारक तुकडीमध्ये रूपांतर करते. **माणसाचे दैव** मधील आंद्री सोकोलोवचा हा मानवतावाद आहे.

लोक आणि क्रांती. अनेक कलाकारांनी हा विषय हाताळला. या विषयाला वाहिलेली अनेक पुस्तके सोविएत वाचकांच्या गाथा बनली आहेत. रजतपटावरील अनेक नायक प्रेक्षकांच्या अंतःकरणांना जाऊन भिडले आहेत.

परंतु क्रांतीमधील प्रसंग, नव्या समाजाच्या उभारणीमधील अवस्था या इतक्या विविधस्वरूपी आहेत आणि त्यांनी संपूर्ण पिढ्यांचे भवितव्य एवढे बदलून टाकले आहे की, प्रत्येक प्रकारच्या कलावंतासमोर नव्या शोधांसाठी अमर्याद क्षितिजे पसरलेली आहेत.

आज घटकेला, रशियामध्ये समाजसत्तावादी क्रांतीला एकावन्न वर्षे झाल्यानंतर, **लेनिनच्या कथा** आणि **पोलंडमध्ये लेनिन** निर्माण करणारे सर्गी युत्केविच व **कम्युनिस्ट** काढणारे युली रेझमान यांचे पूर्वी घडलेल्या घटनांबाबत स्वतःचे असे खास दृष्टिकोन आहेत. अभिजात चित्रपटांचा निर्णायक प्रभाव काहीही असला तरी, ज्या विषयांनी तिसऱ्या आणि चौथ्या शतकांतील चित्रनिर्मात्यांना हलविले, त्या विषयांच्या प्रश्नांना त्यांनी स्वतःची उत्तरे शोधून ती दिली.

अलिकडच्या काळात निरनिराळे प्रकार संपन्न होण्याची विधायक प्रक्रिया आमच्या चित्रसृष्टीत घडत आहे. उत्कृष्ट सोविएत चित्रपट ह्या नवोन्मेषशालिनी कलाकृती आहेत. जीवनातील संघर्ष आणि व्यक्तिरेखा रंगविण्याचे नवनवे मार्ग आमचे चित्रपट-दिग्दर्शक पूर्वीप्रमाणेच शोधीत आहेत.

**माणसाचे दैव** या चित्रपटातील, रशियन युद्धकैद्यांना हिटलरच्या स्वयंसेवकांनी जेथे खेचून नेलेले असते त्या ख्रिस्तमंदिरामधील भावदर्शी आणि भावनाप्रधान प्रसंग—ख्रिस्तमंदिराच्या भिंती आणि मानवतेचे दुःख यांचा स्वरमेळ—यांमुळे संपूर्ण चित्रपटकला संपन्न बनली नाही काय ? **बलाकमाला उडते आहे** मधील निरोपाच्या प्रसंगामधून माणसांच्या स्वभावाचे छोटे छोटे नमुने व त्यांनी आधीच अनुभवलेला सावधगिरीचा इशारा पहायला मिळत नाही काय ?

**सैनिकाचा पोवाडा** मधील आल्योशा आणि त्याला अचानक भेटलेली मैत्रीण यांच्या विशुद्ध आणि तेजस्वी व्यक्तिरेखा ही सबंध चित्रपटातील ठसठशीत अभिव्यक्तीची फलश्रुती नव्हे काय ?

अर्थातच, सामान्य दर्जाच्या चित्रपटांच्या सबंध मालिकेमुळे चित्रपटकलेच्या विकासामध्ये अडथळा आला आणि आमच्या लोकांनी त्यावर योग्य ती टीका केली.

परंतु अनेक चित्रपट, घटना आणि प्रसंग निःसंशयरीत्या—चित्रपटकलेच्या इतिहासात दाखल होतील. **बलाकमाला उडते आहे** मधील बर्च वृक्ष, **माणसाचे**

**दैव** मधील म्हाताऱ्या माणसाने छोट्या पोरक्या पोराजवळ लॉरीमध्ये दिलेली कबुली, लोकांना रोटी आणि ऊब मिळावी म्हणून वेड्यासारखा झाडे पाडीत सुटलेला **कम्युनिस्ट**-मधील वासिली गुबानोव, **संथ वाहते दॉन** मधील अक्सिन्याच्या थडग्यापासून ग्रिगोरीचा वियोग दाखविणारा प्रसंग, **इवानचे बालपण** मधील छोट्या बालवीर इवानचे रागीट डोळे, अल्योशाला घरापासून आईपासून चिरकाळासाठी आघाडीकडे नेणारा **सैनिकांचा पोवाडा** मधील रस्ता, **माझं वय २०** मधील मॉस्कोच्या रस्त्यावरील प्रसंग, हे सारेकाही इतिहासात दाखल झाले आहे.

विषयातील किंवा शैलीतील एकसूत्रीपणाबद्दल आजच्या सोविएत चित्रपटांवर टीका करता येणार नाही.

उदाहरणार्थ, १९६६ साल घ्या. कोणते चित्रपट पडद्यावर आले ? लिओ तोल्स्तोय यांच्या कादंबरीची नवी रजत-आवृत्ती **युद्ध आणि शांतता**, विनोदी आणि चातुर्याने केलेली सुखांतिका **मोटारीच्या शोधात**, दिमित्री शोस्ताकोविच यांच्या संगीतिकेची रजत-आवृत्ती **कतेरिना इस्मायलोवा**, सोविएत-फ्रेंच सहकार्याने निघालेला व रशियात काम केलेल्या विख्यात नर्तकाची— मॉरियस् पेतिपाची—कथा सांगणारा **तिसरा युवक, सामान्य फॅसिझम** हा गंभीर वार्तापट, कौटुंबिक सुख-दुःखे सांगणारा नाट्यमय **आमचे घर**, अलेक्सी तोल्स्तोय यांच्या कथेवरील **विषारी साप** हा उदात्त चित्रपट आणि लेनिन यांच्या कुटुंबावर आधरित **आईचे हृदय**, आनंदी मुलांची कथा सांगणारा **तीन लठ्ठ माणसे**, जॉर्जियन महाकाव्य **सैनिकाचा बाप**, दैनंदिन जीवन आणि नीतीमत्ता यांचे प्रश्न हाताळणारा **बायका**, उपहासात्मक **तेहत्तीस**, युक्रेनियन प्रयोगशील चित्रपट **विसरलेल्या पूर्वजांच्या सावल्या, आता तुझे नांव काय?** हा खिळवून टाकणारा गुप्तहेरपट.

पडद्यावर प्रदर्शित झालेल्या सगळ्या १२० चित्रपटांची यादी येथे देणे शक्य नाही आणि शिवाय त्यांतील काही चित्रपट अतिसामान्य दर्जाचे होते.

१९६६ सालचे आमचे उत्कृष्ट चित्रपट पूर्वीप्रमाणेच मानवतावादी होते आणि म्हणूनच ते श्रेष्ठ होते, जागतिक चित्रपटकलेत त्यांना मिळालेल्या मान्यवर पदाला लायक होते, असा निष्कर्ष जर काढला तर तो सबळ ठरेल.

## सर्वत्र चलचित्रपट

या शब्दांना दुसरा अर्थ असू शकेल. पण त्यांचा अर्थ काहीही असला, तरी आमच्या देशाच्या बाबतीत मात्र ते सार्थ आहेत. मी पूर्वी सांगितल्याप्रमाणे, देशाच्या

कानाकोपऱ्यात पांढरे पडदे जाऊन पोचले आहेत. चलच्चित्रपटनिर्मिती आता केवळ मॉस्को, लेनिनग्राद आणि कीएवपुरतीच मर्यादित राहिली नाही. प्रत्येक सोविएत प्रजासत्ताकाचा आता स्वतःचा स्टुडिओ आहे.

१९६५ च्या उन्हाळ्यात स्वित्झर्लंडमधील लोकार्नो येथे एक चित्रपट-महोत्सव भरला होता. लोकार्नो महोत्सवाचा फारसा गाजावाजा होत नाही, कारण तेथील प्रमुख प्रेक्षक म्हणजे चित्रपटतज्ज्ञ आणि पत्रकार असतात, आणि पत्रकार-परिषदांमध्ये ते चित्र-पटांवर चर्चा करतात. अशा या पवित्र आणि प्रतिष्ठित महोत्सवात **मुलगी आणि प्रतिध्वनी** हा सोविएत चित्रपट दाखविला गेला. एक मुलगी, एक मुलगा आणि त्यांचे पोरसवदा प्रेम यांवरचा तो एक बाह्यतः सामान्य चित्रपट वाटत होता. चित्रपटाची भाषा प्रेक्षकांना जरी अनोळखी होती आणि चित्रपटाच्या जरी फ्रेंच भाषेत होत्या, तरी त्यातील पावित्र्याने आणि कळकळीने परीक्षकांवर आणि प्रेक्षकांवर असा काही प्रभाव पडला की, त्या चित्रपटाला रुपेरी शिडाचे पारितोषिक मिळाले.

पत्रकार-परिषदेत पत्रकारांनी पृच्छा केली. अंतःकरणाला भिडणारा हा काव्यमय चित्रपट जर सोविएत संघराज्यात निर्माण झाला, तर त्यातील नायक कोणती भाषा बोलत होते ? त्यांना सांगण्यात आले की, तो चित्रपट लिथुआनियाच्या स्टुडिओत तयार करण्यात आला आणि त्यातील नायक तेथील स्थानिक भाषेत संवाद बोलले आहेत.

अनेकांना ही गोष्ट नवी होती. सोविएत बाल्तिक प्रजासत्ताकांबद्दल पाश्चात्त्य वृत्तपत्रे अनेक खोट्यानाट्या बातम्या छापतात, आणि इथे तर लिथुआनियाचा स्वतःचा चित्रपट-उद्योग होता व उत्तम दिग्दर्शन, छायाचित्रण आणि अभिनय असलेला चित्रपट तिथे निर्माण झाला होता.

**मुलगी आणि प्रतिध्वनी** हा लिथुआनियात 'वरचढ' ठरलेला एकच चित्रपट नव्हे, असे तेथील चित्रपट-उद्योगाचा प्रतिनिधी मुलाखतकारांना सांगू शकला असता. **जिवंत नायक** आणि **रात्रीतली पावले** यांसारखे उत्तम चित्रपट लिथुआनियन स्टुडिओच्या खाती जमा आहेत. वितावृतस जेलाक्याविचूस यांच **कुणालाही मरण नको असते** हा चित्रपट कीएव येथील अखिल संघीय चित्रपट-महोत्सवात १९६६ साली उत्कृष्ट ठरला. जाणकार व स्वतंत्र शैलीचे दिग्दर्शन आणि अभिनय यांचा आविष्कार घडविणाऱ्या या कुशल चित्रपटकृतीत गुंतागुंतीच्या लिथुआनियन व्यक्तिवैशिष्ट्यांचा परिचय करून देण्यात आला आहे. युद्धोत्तर काळा-नंतरच्या पहिल्या काही वर्षांमध्ये, बाल्तिक प्रजासत्ताकांमध्ये मागे राहिलेल्या काही फॉसिस्टांविरुद्ध शेतकऱ्यांना आपल्या शांततामय कार्याच्या रक्षणार्थ लढा द्यावा लागला, त्या काळातील वर्गलढ्याचे भावनोद्दीपक आणि आणि खोचक चित्रण या चित्रपटात

करण्यात आले आहे. यातील प्रसंग ऐतिहासिक वास्तवदर्शीपणाने आणि तात्त्विक सखोलतेने सादर करण्यात आले आहेत.

मॉस्कोतील चौथ्या आंतराष्ट्रीय चित्रपट-महोत्सवाच्या वेळी ( १९६५ ) रेझो च्खीद्झे यांच्या **सैनिकाचा बाप** मध्ये बापाची भूमिका करणारे जॉर्जियन अभिनेते सेर्गो झाकारिआद्झे यांनी सर्वांचे लक्ष वेधून घेतले, हे आपल्याला माहीतच आहे महोत्सवाच्या नांदीला प्रदर्शित झालेल्या या त्बिलिसीच्या निर्मितीने नंतर अथेन्स, टोकियो, बुडापेस्ट, बर्लिन, सान फ्रान्सिस्को आणि रोम येथे अफाट यश मिळविले. जॉर्जियात तयार झालेला चित्रपट आता सोविएत जनतेची मर्दुमकी लोकांना सांगतो, आघाडीवर आपल्या मुलाचा शोध घेणाऱ्या जॉर्जियन शेतकऱ्याबद्दलचे महाकाव्य ऐकवीत जगाची वाटचाल करून येतो.

अशा प्रकारची लोकप्रियता मिळविणारा हा काही एकच जॉर्जियन चित्रपट नव्हे. रेझो च्खीद्झे, तेंगिझ अबुलाद्झे आणि शेंगेलाया-बंधू यांच्यासारखे हुषार तरुण दिग्दर्शक स्थानिक राष्ट्रीय पार्श्वभूमीवर चित्रपट निर्माण करीत आहेत आणि नव्या दृष्टिकोनाचे दर्शन घडवीत आहेत. मिखाइल कोबाखिद्झे यांनी निर्माण केलेला **विवाहसोहळा** हा लघुपट बहुतेक सगळ्या चित्रपटमहोत्सवांमधून दाखविला गेला आहे.

आर्मेनियातील येरेवानमधील फ्रुन्झे दावलात्यान यांनी तयार केलेला **नमस्कार ! तो मीच !** हा जीवन आणि सत्य या विषयावरील चित्रपट यशाचा विस्तृत मार्ग पादाक्रांत करीत आहे.

**विस्मृत पूर्वजांच्या सावल्या** सारखे उपरोल्लेखित चांगले चित्रपट युक्रेनमधील स्टुडिओ निर्माण करीत आहे.

मोल्दावियामध्ये वादिम दर्बेनेव यांनी अपूर्व आणि नाजुक पद्धतीने **शरदातील शेवटचा महिना** निर्माण केला आहे.

दूरदूरची चित्रणस्थळे, प्रशिक्षित तज्ज्ञांचा अभाव इत्यादी अडचणी असूनही उझ्बेकिस्तान, किर्घिझिया, ताजिकिस्तान, तुर्कमेनिया या मध्य-आशियाई प्रजासत्ताकांमधील व कझाखस्तानमधील अल्मा-अता स्टुडिओमधील चलच्चित्रनिर्मिती जास्तीत जास्त गरजा समाधानकारकरीत्या पुऱ्या करीत आहे.

नव्या जीवनाकडे पहिली पावले टाकणाऱ्या किर्घिझियातील लोकांच्या तरल भावना व्यक्त करणारी चित्रकथा सांगणाऱ्या आन्द्री कोन्चालोव्स्की यांच्या **पहिला शिक्षक** या चित्रपटाची सोविएत वृत्तपत्रांनी भरपूर स्तुती केली आहे. हा चित्रपट किर्घिझियामध्ये तयार करण्यात आला.

उझबेकची राजधानी असलेल्या ताश्कंदमधील प्रचंड चित्रपट-स्टुडिओमध्ये [ भूकंपामध्ये त्यांचा एकाही इमारतीला तडा गेला नाही. त्याच्या बाजूची घरे मात्र कोसळली ] देशांतील भूत-वर्तमानाच्या कथा सांगणारे अनेक चित्रपट तयार झाले.

या स्टुडिओंच्या बहुतांश निर्मितीचे श्रेय सोविएत संघराज्याच्या बहुराष्ट्रिक चित्रपट उद्योगाला जाते. सोविएतांच्या विस्तीर्ण भूमीतील विविध विभागांमध्ये निर्माण झालेल्या संपन्न कलांबद्दल, सोविएत चित्रपट-विद्यालयाच्या परिपक्वतेने निर्माण केलेल्या परस्पर-प्रभावाबद्दल आणि व सोविएत चित्रपटांच्या मान्यवर ' जुन्या ' केंद्रांतील श्रेष्ठ प्रतिनिधीं-कडून संघ-प्रजासत्ताकांमधील तरुण चित्रपट-निर्मात्यांना मिळणाऱ्या धड्यांच्या फायद्यांबद्दल बोलण्याचा आम्हाला आता पूर्ण अधिकार आहे.

सगळीकडेच चलच्चित्रपट ! आणि केवळ कथात्मक चित्रपटच नव्हेत. चालू घडीचा अहवाल देणाऱ्या केवळ माहितीवजा साधनाऐवजी, वार्तापट आता कलेचे निष्कर्ष काढीत असलेले व सामाजिक विकासाच्या प्रक्रियांचा अभ्यास करीत असलेले आपल्याला दिसत आहेत. प्रतिमांच्या आणि महान्उदात्त कल्पनांच्या बळावर कथाप्रधान चित्रपटा-प्रमाणे ते लोकांच्या मनांवर व अंतःकरणांवर आपला प्रभाव पाडू लागले आहेत.

रेखनयुक्तवृत्तपत्रव्यवसायाच्या मार्गावर प्रगती करणारे सोविएत वार्तापट विविध विषयांची आणि ऐतिहासिक घटनांची सखोल, कलात्मक आणि ठसठशीत अभिव्यक्ती घडवितात.

रोमन कार्मेन यांनी आपल्या ४० वर्षांच्या कारकीर्दीत आमच्या देशातील युद्धपूर्व उभारणीची, स्पेनमधील यादवी युद्धाची आणि सोविएत सैन्याच्या मर्दुमकीची नोंद घेतली आहे. **महान् देशरक्षकयुद्ध** ह्या त्यांच्या अलीकडील भव्य वार्तापटाला राष्ट्रीय पातळीवर यश मिळाले आहे.

झिगा वेर्तोव यांचे शिष्य इल्या कोपालिन यांनी देशातील चळवळी आणि विकास दाखविणारे, तसेच क्रांतीत सहभागी झालेले व तिचे उद्दिष्ट उंचाविणारे लोक दाखविणारे अनेक वार्तापट संकलित केले आहेत.

क्रांतीला प्रेरणा देणाऱ्या लेनिन यांचे सैद्धांतिक कार्य अतिशय आकर्षक पद्धतीने पडद्यावर सांगणारे फ्योदोर त्यापकिन आणि इल्या फ्रादकिन यांनी लेनिन यांचे हस्तलिखित रुपेरी पडद्यावर दाखविले.

सोविएत संघराज्यातील प्राणिमात्रांचे रजतदर्शन घडविणारे अलेक्झांदर झगुरिदी आणि बोरिस दोलिन यांना जगन्मान्यता मिळाली आहे.

अधिक संपन्न व भावदर्शी साधनांचा आणि नव्या पद्धतींचा वापर—सुसंवादी अहवाल, प्रदीर्घ चित्ररूप निरीक्षणे, छायाचित्रणाच्या छुप्या व उघड पद्धतींचा वापर—

आणि **संकलनाच्या** नव्या पद्धती, **यांचे दर्शन** सगळ्या पिढ्यांमधील श्रेष्ठ वार्तापट-निर्मात्यांच्या कलाकृतींमध्ये घडते. रंग, ध्वनी आणि विस्तीर्ण पडदा यांचा व्यापक आणि स्वतंत्र पद्धतीने वापर केला जातो. महत्त्वाची गोष्ट म्हणजे, वार्तापटांच्या शास्त्राला आता लेखनाची आवश्यकता भासत आहे. मात्र, फॅसिझमचे त्याच्या जन्मापासून नाशापर्यंतचे चरित्र सांगताना अधूनमधून त्यावर भाष्ये करणारा दिग्दर्शकाचा आवाज मिखाईल रॉम यांच्या **सामान्य फॅसिझम** मध्ये ऐकू येत असला, तरी असे प्रयत्न फारच थोडे झाले आहेत.

परंतु अनेक वार्तापटांमधील निवेदकाचा भावनाविहीन आवाज गेला असून त्याजागी लेखकाची स्वतःची भाष्ये ऐकू येऊ लागली आहेत.

नौदलामध्ये युध्दकाळात काम केलेल्या स्त्रीची हृदयस्पर्शी कहाणी सांगणारा विक्तर लिसाकोविच यांचा **कातुश्या**, मॉस्कोचे रक्षण करणाऱ्यांवरील रोमन ग्रिगोऱ्येव यांचा चित्रपट आणि सर्गी ओब्राझ्त्सोव यांचा **आपल्याभोवतालची आश्चर्ये** हे तीन चित्रपट अशा प्रकारचे आहेत.

सर्व पंधरा संघ-प्रजासत्ताकांमध्ये आणि वोल्गा जिल्हा व अुरल अशा सैबेरियातील मोठ्या केंद्रांमध्येही वार्तापट, वैज्ञानिक व भौगोलिक चित्रपट तयार केले जातात.

## प्रत्येक खंडात

विख्यात सोविएत पत्रकार मिखाइ कोल्त्सोव यांनी १९२५ मध्ये **पोत्योम्किन युध्द्नौका** या चित्रपटाचे समीक्षण करताना त्याच्या युरोपातील यशाची फार सुरेख मीमांसा केली होती.या चित्रपटाचे झंझावाती यश म्हणजे जागतिक क्रांतीची सुरुवात आहे, असे म्हणणाऱ्यांचा त्यांनी उपहास केला होता.अर्थातच हा चित्रपट क्रांतिकारी आहे, नव्हे ' शुद्ध क्रांतिकारी ' आहे हे त्यांना मान्य होते. परंतु संसदीय निषेध व चौकशा होऊनही या चित्रपटाने जागतिक रजतपटावर विजयी वाटचाल केली, याचे कारण त्यांच्या मते या चित्रपटाच्या केवळ क्रांतिकारी स्वरूपात नाही, तर त्याच्या बुद्धिमान तरुण दिग्दर्शकाच्या आणि छायाचित्रकाराच्या कौशल्यात आहे. या समीक्षणाला स्वतः कोल्त्सोव यांनी ' चांगली काम ' म्हणून संबोधिले आहे.

**पोत्योम्किन युद्धनौका** हा चित्रपट सध्या सर्वत्र अभिजात चित्रपट म्हणून ओळखला जातो. या चित्रपटाच्या प्रती जगातील चित्रपट-भांडारांमध्ये काळजीपूर्वक जतन करून ठेवलेल्या आहेत.

जगातील सर्वात श्रेष्ठ अशा शंभर चित्रपट–तज्ज्ञांनी गुप्त रीतीने मतदान करून या चित्रपटाची सर्वात श्रेष्ठ म्हणून निवड केली आहे. चार दशकांपूर्वी या चित्रपटावर

ज्या ठिकाणी सेन्सॉरचा रोष ओढवला होता, त्या म्युनिच आणि हॅम्बुर्गमध्ये आता **पोत्योम्किन** वर परीक्षेसाठी प्रबंध लिहिले जात आहेत. चित्रपटांच्या इतिहासाचे सिंहावलोकनात्मक प्रदर्शन या चित्रपटाने सुरू केले जाते. ज्ञानकोश, संदर्भ आणि पाठ्यपुस्तकांमध्ये त्याचा उल्लेख होतो.

एक दशकापूर्वी, **बलाकमाला उडते आहे, सैनिकाचा पोवाडा** आणि **माणसाचे दैव** हे चित्रपट म्हणजे परदेशी चित्रपट-प्रेक्षकांना खरोखरीच एक नवे दर्शन होते.

त्यासुद्धा 'चांगल्या' कृती होत्या. सोविएत चित्रपटदिग्दर्शकांनी निर्माण केलेल्या चित्रपटांनी परदेशी प्रेक्षकांना संपूर्णपणे एका नव्या जगाची, लोकांमधील नव्या नात्यांची, नव्या उत्कृष्ट व्यक्तिरेखांची ओळख घडविली.

सोविएत चित्रपटांच्या गुणांची आणि सामर्थ्याची जगाला ओळख पटली आहे.

याकोव सेगेल आणि लेव कुलिद्जानोव यांच्या **माझे घर** ला ब्रुसेल्स येथील जागतिक मेळाव्यात मुख्य पारितोषिक मिळाले. जॉर्जी दानेलिया आणि इगोर तालान्किन यांच्या छोट्या **सेर्योझाने** युरोप-अमेरिकेतील रजतपटांवरून आपले मोठे मोठे डोळे रोखून विश्वासाने पाहिले. **संथ वाहते दॉन** हा चित्रपटही जगात अनेक ठिकाणी दाखविला गेला.

अजरामर झालेल्या दोवझेन्को यांच्या पटकथेवर आधारित युलिया सोल्न्सेवा-निर्मित **ज्वालांमधील वर्षे** ब्रिटन व जपानमध्ये कमालीचा लोकप्रिय ठरला.

**काहिएर्स दु सिनेमा** नामक दहा फ्रेंच टीकाकारांनी चालविलेल्या मासिकाने (एक टिंब—बघण्यालायक नाही, दोन टिंबे बघायला हरकत नाही—, तीन टिंबे—बघितलाच पाहिजे आणि चार टिंबे—सर्वोत्कृष्ट) जास्तीत जास्त गुण **भारलेली देस्ना** ला दिले.

**विस्मृत पूर्वजांच्या सावल्या** च्या उद्घाटनानंतर दुसऱ्या दिवशी या काव्यमय चित्रपटावर सगळ्या फ्रेंच वृत्तपत्रांमधून स्तुतीचा वर्षाव झाला. **फ्रान्स सायर** ने म्हटले होते, "चित्रपटकलेचा हा सर्वोत्कृष्ट नमुना आहे. असा सुंदर आणि काव्य-मय चित्रपट आम्ही अद्याप पाहिला नाही."

**इवानचे बालपण** आणि इतर चित्रपट निर्माण करणाऱ्या आमच्या तरुण दिग्दर्शकांचे असे खूप कौतुक झाले आहे.

याआधी मी उल्लेख केल्याप्रमाणे, सोविएत चित्रपटांनी जगातील मोठ्या चित्रपट-महोत्सवांमधून सर्वोच्च पारितोषिके मिळविली आहेत. केन्समधील 'गोल्ड पाम' चा मानकरी म्हणून **बलाकमाला उडते आहे** ची निवड झाली होती

याच महोत्सवामध्ये **सैनिकाचा पोवाडा, एकेचाळीस, कुत्रा घेतलेली सरदारीण, आशावादी शोकांतिका, पोलंडमध्ये लेनिन** आणि **जॉर्जियन** लघुपट **लूर्दजा मग्दानी** यांना इतर बक्षिसे मिळाली आहेत. मॉस्को चित्रपट-महोत्सवात **माणसाचे दैव, निरभ्र आकाश, युद्ध आणि शांतता** व **दोघे** यांना पारितोषिकांचा मान मिळाला. व्हेनिस, कार्लोवी वारी, लोकार्नो, मार देल प्लाता, ॠको लायप्त्सिश्, सान सेबॅस्टिअन, ओबरहावूसेन, सान फ्रान्सिस्को या ठिकाणी झालेल्या आंतरराष्ट्रीय चित्रपटमहोत्सवांमध्ये सोविएत चित्रपटांना बक्षिसे मिळाली आहेत. (**एका वर्षातील नऊ दिवस, जिवंत आणि मृत, संथ वाहते दॉन, सेर्योझा, इवानचे बालपण, नवागतासाठी शांतता, ओळख, हॅम्लेट, महान् देशरक्षक युद्ध, कात्युशा, मर्दुमकी, माझं वय २०, मंतरलेली बेटे, नीलकमलिनी, लग्नसोहळा, विस्मृत पूर्वजांच्या सावल्या, तुमचे रक्त, एका गुन्ह्याची गोष्ट** आणि इतर वार्तापट, विज्ञानपट तसेच व्यंगचित्रपट)

सेंट मार्कचा सोनेरी सिंह आणि व्हेनिस येथील युवक चित्रपटमहोत्सवातील सर्वोच्च बक्षीस **डिंगो** आणि **घंटा वाजली, दार उघड** या चित्रपटांनी पटकाविले. आमच्या मुलांची साऱ्या जगाला ओळख करून देणारे हे चित्रपट आहेत.

१९६६ च्या उन्हाळ्यात, मिलान येथील 'रिट्झ' मध्ये जॉर्जी दानेलिया यांच्या **मी मॉस्कोत फिरतो** या चित्रपटाचे उद्घाटन झाले. प्रेक्षकांनी आणि वृत्तपत्रांनी या चित्रपटाचे सारख्याच मापाने कौतुक केले. 'मॉस्कोत घालविलेल्या एका दिवसाच्या नाजुक आठवणी' सांगताना पेत्रो बिमान्की यांनी **इल् गिओर्नो** मध्ये लिहिले आहे की, हा चित्रपट "हलकाफुलका, चतुराईने नटलेला आणि जीवनाविषयीच्या आशावादी दृष्टिकोनाने भारलेला आहे. त्यात अलंकारिकता, खोटेपणा आणि कंटाळ्याचा मागमूसही नाही."

हा चित्रपट सबंध इटलीमध्ये दाखविण्यात आला आणि प्रत्येक ठिकाणी स्थानिक वृत्तपत्रांनी त्याची अफाट स्तुती केली.

'सुरेख हॅम्लेट' असे उद्गार एका नॉर्वेजिअन वृत्तपत्राने ग्रिगरी कोझिन्त्सेव यांच्या चित्रपटाबद्दल काढले. शेक्सपीअरच्या या शोकांतिकेवर आधारलेल्या चित्रपटांची कसून छाननी करणाऱ्या डॅनिश वृत्तपत्रांनीही म्हटले आहे :

"वृत्तपत्रकारांसाठी आयोजित केलेल्या खास खेळाला आम्ही सोविएत **हॅम्लेट** पाहिला. या चित्रपटातून रशियन आणि शेक्सपीअरच्या अशा दोन्ही शोकांतिकांचे दर्शन घडते. ही एक जगातील परिपूर्ण कलाकृती आहे. आमच्या काळातील सर्वश्रेष्ठ शेक्सपीअर-तज्ज्ञ ग्रिगरी कोझिन्त्सेव यांनी या रशियन **हॅम्लेटचे** दर्शन

डविले आहे. आजच्या काळातील चित्रपट-प्रेक्षकांना ओळखू येतील आणि शेक्सपीअरच्या काळातील हॅम्लेटचेही दर्शन घडेल असा **हॅम्लेट त्यांना दाखवायचा** होता....या सोविएत चित्रपटाचा प्रेक्षकांवर विलक्षण प्रभाव पडतो.

१९६५ साली चिलीमध्ये नामवंत **लेखक, पत्रकार** आणि नट यांचा समावेश असलेल्या परीक्षक-मंडळाने २७१ चित्रपटांमध्ये सोविएत **हॅम्लेट** ची सर्वश्रेष्ठ चित्रपट म्हणून निवड केली होती.

टोकियो, ओसाका आणि हिरोशिमा येथील सोविएत चित्रपटमहोत्सवांमध्ये **महान् देशरक्षक युद्ध, सैनिकाचा बाप, बलखोय बॅले** आणि **दोघे** हे चित्रपट दाखविण्यात आले. हे चित्रपट पाहण्याची इच्छा असलेल्या निम्म्या लोकांना जागे-अभावी परत जावे लागले, ही गोष्ट नोंद करण्यासारखी आहे.

फॅसिस्ट रानटीपणाविरुद्ध लढून मर्दुमकी गाजविणाऱ्यांचे स्मरण **महान् देशभक्त युद्ध** ह्या रोमन कार्मेनिर्मित चित्रपटाने अनेक प्रेक्षकांना दिले व त्यांच्या अंतःकरणात खळबळ माजविली.

मिखाइल रॉमनिर्मित **सामान्य फॅसिझम** हा भावनोत्प्रेरक चित्रपट लंडन, ब्रुसेल्स, म्युनिच आणि पश्चिम बर्लिनमध्ये दाखविण्यात आला. नव-फॅसिस्टांविरुध्द त्यात उघड उघड लढा दिसतो.

**चापायेव, आशावादी शोकांतिका** या चित्रपटांचे हजारो अल्जेरियन प्रेक्षकांनी अमाप कौतुक केले.

**युध्द आणि शांतता** चे पहिले दोन भाग मॉस्को, पॅरिस आणि टोकियोमध्ये जवळजवळ एकाच वेळीं प्रदर्शित झाले. **फ्रान्स सॉयर** ने म्हटले आहे, " कादंबरी-प्रमाणेच हा चित्रपट त्यामधील घटनांमुळे, चित्रीकरणाच्या सखोलतेमुळे आणि विविध मनोविष्कारांमुळे प्रेक्षकाला धुंद करतो."

## मास्को—महोत्सवनगरी

१९६५ च्या उन्हाळ्यात ५७ देशांमधील चित्रपट—उद्योगाचे प्रतिनिधी मॉस्कोत जमले होते. चौथ्या आंतरराष्ट्रीय चित्रपटमहोत्सवात भाग घेण्यासाठी नट, दिग्दर्शक, टीकाकार, तज्ज्ञ आणि या अतिश्रमाच्या उद्योगाशी निगडित असलेले व्यावसायिक लोक सोविएत राजधानीत जमले होते. आता परंपरा बनलेले त्यावेळचे मॉस्कोचे जागतिक व्यासपीठ आजपर्यंतच्या कुठल्याही महोत्सवापेक्षा अधिक प्रातिनिधिक होते. इतकी चित्रपट-प्रतिनिधीमंडळे कुठेच एकत्र आली नव्हती. सुमारे ९०० चित्रनिर्माते आणि नट मॉस्कोत आले. आधुनिक चित्रपटकलेच्या विविध धारणांचे इतके प्रतिनिधी कुठल्याही चित्रपटमहोत्सवाला आजवर जमा झाले नव्हते.

वेगवेगळी वैचारिक व कलात्मक तत्त्वे महोत्सवाच्या पडद्यावर झळकली. मनोरंजक चित्रपट दाखविले गेले, तंत्राच्या आणि शैलीच्या दृष्टीने सुधारणावादी असे चित्रपट दाखविले गेले, रूपककथा रजतपटावर दिसल्या, तसेच सत्याने परिपूर्ण व माणसाच्या सर्जनशील शक्तीमध्ये निष्ठा व्यक्त करणारे चित्रपटही दाखविले गेले. सर्वोच्च अधिकार असलेल्या परीक्षकांनी त्यांचे कौतुक केले. शांतता आणि मानवतावादी ध्येयाची सेवा करणाऱ्या चित्रपटांना सर्वोच्च बक्षिसे मिळाली.

क्रेमलिन प्रासादाच्या रंगमंचावर सेर्गो झकारियाद्झे यांच्याबरोबर सोफिया लॉरेन पहिल्या क्रमांकाची बक्षिसे घेण्यासाठी आली. फेडरिको फेलिनी, स्टॅन्ले क्रॅमर, मायकेलां-जेलो, अंतोनिओनी यांच्यासारखे विख्यात दिग्दर्शक आणि जिना लोलोब्रिगिडा, ग्युलिएता मसिना, एलिझाबेथ टेलर, तोसिरो मिफुने, जॅक लेमन, रेक्स हॅरिसन, सिमोन सिनोरेत, वेज मॅाताय, मरिना व्लादी, राज कपूर यांचे आणि इतर अनेक जागतिक कीर्तीच्या नट-नटींचे मॉस्कोवासीयांना दर्शन घडले.

त्यांपैकी एक जरी व्यक्ती हजर असती तरी महोत्सवाला शोभा आली असती.

अत्यंत कामात असलेल्या या नामवंत लोकांनी आपली सारी कामे बाजूला ठेवून मॉस्कोला जाण्याचे कारण काय ? याचे कारण मॉस्कोमध्ये पाश्चात्य चित्रपटकला आणि समाजसत्तावादी चित्रपटकला यांचा संगम झाला आहे. बहुसंख्य कलानिष्ठ पश्चिमी कलावंतांना नव्या समाजसत्तावादी जगाची आणि तेथील नव्या कलेची ओळख करून घ्यायची इच्छा होती. पांचवा आंतरराष्ट्रीय चित्रपटमहोत्सव मॉस्कोत १९६७ मध्ये भरला. या अपूर्व प्रयोगामुळे, चित्रनिर्माते जेथ दक्षतेनेच येतात अशा या मॉस्को चित्रपटमहोत्सवाला सर्वात मोठ्या जागतिक व्यासपीठाचे स्थान प्राप्त झाले आहे. सगळ्या आंतरराष्ट्रीय चित्रपटमहोत्सवांमध्ये वयाने छोट्या असलेल्या या चित्रपट-महोत्सवाचा अधिकार मात्र अपवादात्मकरीत्या महान् आहे आणि जागतिक चित्रपट-कलेच्या दृष्टीने त्याचे मूल्यमापन करणे अवघड आहे.

मॉस्को महोत्सव केवळ प्रदर्शनी नसतात. चालू जमान्यातील चित्रकरणाच्या प्रश्नांवर तेथे चर्चाही घडतात.

समाजसत्तावादी देशांतील चित्रपट-उद्योगाने केलेली प्रगती ते दाखवितात. त्यांच्या बहुतेक चित्रपटांनी सर्वोच्च बक्षिसे पटकावली आहेत. मॉस्को-महोत्सव ही एक अशी जागा आहे की, ज्याठिकाणी आशिया-आफ्रिकेतील विकसनशील देशांमधील चित्र-निर्मात्यांना आपल्या श्रमांचे फळ दाखविता येते. मॉस्कोत ते आमच्या स्टुडिओंच्या कार्यपद्धतीचा अभ्यास करतात, मॉस्को चित्रपटकलाशास्त्र-संस्थेच्या आणि चित्रपट-वितरण-संघटनांच्या कार्याचा अभ्यास करतात.

मॉस्कोत झालेल्या जागतिक चित्रपटमहोत्सवांनी दाखवून दिले आहे की, ' चित्रपटकलेतील मानवतावादासाठी, देशांमधील शांतता आणि मैत्रीसाठी ' हे त्यांचे उद्दिष्ट जगातील पुरोगामी चित्रनिर्मात्यांनी उचलून धरले आहे.

## आणखी थोडेसे

सोविएत संघराज्यात कथाप्रधान चित्रपट निर्माण करणारे २० स्टुडिओ दरसाल संपूर्ण लांबीचे १२० पेक्षा अधिक चित्रपट १५ भाषांमधून तयार करतात. १००० पेक्षा अधिक वार्तापट, शैक्षणिक व वैज्ञानिक चित्रपट विशिष्ट दर्जा असलेल्या ४० लघुपट निर्मिति-केंद्रांमधून निर्माण होतात. दोन संस्था सोविएत चित्रपट-उद्योगासाठी तज्ज्ञ तयार करतात.

पहिली विख्यात अखिल संघ सरकारी चित्रपटशास्त्रशिक्षणसंस्था होय. या ठिकाणी सर्गी आयजेन्स्टाइन यांनी जागतिक चित्रपटकलेच्या विकासावर व्याख्याने दिली आहेत. काव्यमय चित्रपटशास्त्राच्या तत्त्वांवर इथेच अलेक्झांदर दोवशेन्को बोलले आहेत आणि व्सेवोलोद पुदोवकिन यांनी इथेच चित्रपट-निर्मितीची कला शिकविली. मिखाइल रॉम, सर्गी गेरासिमोव आणि लेव कुलेशोव सध्या याच ठिकाणी दिग्दर्शक, छायाचित्रणकार आणि नट निर्माण करीत आहेत. जगातील अनेक देशांचे प्रतिनिधी या संस्थेत शिक्षण घेतात.

चित्रपट-अभियंत्यांची दुसरी संस्था लेनिनग्रादमध्ये आहे. ' मॉस्को फिल्म अँड फोटो रिसर्च इन्स्टिट्यूट ' बरोबरच ही संस्था सोविएत चित्रपट-उद्योगाच्या तांत्रिक प्रगतीला हातभार लावते.

सोविएत संघराज्यातील चलच्चित्रनिर्मिती ही एक प्रचंड आणि गुंतागुंतीची अर्थव्यवस्था आहे. तिच्यामध्ये स्टुडिओज्, संस्था, रसायन-शाळा, सोविएत संघराज्याचा सुप्रसिद्ध सरकारी चित्रपटनिधी आणि दररोज १२,०००,००० चित्रपटप्रेमी ज्यांना भेटी देतात अशी चित्रपटगृहे व मंडळे यांचा समावेश आहे.

सोविएत चित्रपटक्षेत्र उगीच वेळ फुकट घालविणारे नाही. त्याचा हरतऱ्हेने विकास चालू आहे. सगळ्या पिढ्यांचे दिग्दर्शक आणि पटकथालेखक संशोधन करून आपल्या चित्रपटांसाठी नवनवे विषय शोधून काढतात. चित्रपटकला विकासित करण्याच्या मार्गांबाबत आणि साधनांबाबत, तसेच अत्यंत लोकप्रिय असलेल्या या कलाप्रकारातील नव्या चित्रपटांबाबत आणि धारणांबाबत चित्रपटतज्ज्ञ-संघाच्या सर्जनशील संघटनांमध्ये चर्चा होतात.

चित्रपटामध्ये फार मोठ्या सुप्त शक्ती असतात. तो जगाचा आरसा आसतो. तसेच समाजाला आणि मानवाला बदलण्याचे साधन असतो. सोविएत संघ-राज्याच्या ५० व्या

वर्धापनदिनी झालेल्या उत्सवांमध्ये सोविएत चित्रपटकलेतील श्रेष्ठींनी गत कालातील आपल्या कार्याचा आढावा घेतला आणि आता ते नवे चित्रपट तयार करीत आहेत. क्रांतीमधून जन्मलेल्या सोविएत चित्रपटाचा संपूर्ण मार्ग ज्यांच्याशी निगडित आहे त्या लोकांचे हितसंबंध राखण्यासाठी आणि समाजाच्या विकासाला उत्तेजन देण्यासाठी त्यांना प्रत्येक चित्रपट निर्माण करावयाचा आहे.

—०*०—